२४/१०

# नवभारत

ऑक्टोबर २००७




अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६१ । अंक १ । ऑक्टोबर २००७
भाद्रपद/अश्विन शके १९२९
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २०/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक व प्राज्ञपाठशाळा मंडळ सहमत असतीलच, असे नाही.

---

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
सरोजा भाटे

**संपादक :**
श्री. मा. भावे

**संपादक मंडळ :**
वसंत पळशीकर, सुधीर रसाळ,
सीताराम रायकर, यशवंत कळमकर

प्राज्ञ पाठशाळा मंडळ
वाई
२४/१०
ग्रंथालय

**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

---

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियत-कालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

## लेखक परिचय

- **ले. ज. दत्तात्रय शेकटकर (निवृत्त)**

  श्री. शेकटकर हे भारतीय सैन्यात लेफ्टनंट जनरल या मोठ्या पदावर होते. सैन्यात असताना त्यांना विशिष्ट सेवा मेडल, अतिविशिष्ट सेवा मेडल आणि परम विशिष्ट सेवा मेडल असे बहुमानाचे पुरस्कार मिळालेले आहेत.
  ***पत्ता :*** ११२।१, कोरेगांव पार्क, गल्ली क्र. ४ अ, पुणे – ४११ ००१ फोन नं. २६११३५८१.

- **श्री. विश्वास दांडेकर**

  निवृत्त उच्चपदस्थ अधिकारी, आयुर्विमा महामंडळ, इतिहास, युद्धे व युद्धशास्त्र या विषयांमध्ये विशेष रूची व अभ्यास, वृत्तपत्रे व नियतकालिके यांमधून प्रासंगिक लेखन.
  ***पत्ता :*** मालवती, १७ ब, कांगा कॉलनी, सदरबझार, सातारा.

- **श्री. अजेय लेले**

  दिल्ली येथे Institute of Defence Studies Analysis (IDSA) संशोधन करीत असतात.
  फोन नं. ९८११२३३६०७. e-mail - ajey.leleegmail.com

- **डॉ. अरुणकुमार भट्ट**

  डॉ. भट्ट यांनी संरक्षणशास्त्र या विभागातून विद्यावाचस्पती ही पदवी प्राप्त केली आहे. त्यांच्या संशोधनाचा विषय 'मनोयुद्ध' हाच होता. ते 'द हिंदू' या वृत्तपत्राच्या मुंबई येथून प्रसिद्ध होणाऱ्या आवृत्तीच्या संपादकीय विभागात काम करतात. त्यांनी 'नवभारत'साठी प्रस्तुत लेख इंग्रजीतून लिहिला त्याचे डॉ. श्री. मा. भावे यांनी केलेले भाषांतर या अंकात प्रसिद्ध केलेले आहे.

- **प्रा. डॉ. ए. बी. जगदाळे**

  प्रपाठक, राज्यशास्त्र विभाग, एस. जी. एम. कॉलेज, कराड .

- **प्रा. श्री. मा. भावे**

  प्रपाठक व विभाग प्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पी.एच्.डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षक चळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान विषयावर २५ शोधनिबंध प्रसिद्ध.
  ***पत्ता :*** ३३१२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११ ००४.

***संपादक मंडळ या सर्व लेखकांचे मन:पूर्वक आभारी आहे. त्यांनी परिश्रमपूर्वक उत्तम लेखन करून वेळेवर या अंकासाठी पाठविले.***

# संपादकीय

ऑक्टोबर १९४७ मध्ये 'नवभारत'चा पहिला अंक प्रसिद्ध झाला. श्री. शंकरराव देव हे मासिकाचे संचालक होते. आचार्य शं.द. जावडेकर, आचार्य स.ज.भागवत, श्री. हरी कृष्ण मोहनी आणि प्रो.वि.म. बेडेकर अशा चौघांचे संपादक मंडळ होते. नोव्हेंबर १९४७ च्या अंकात प्रो.वि.म. बेडेकर यांच्या नावापुढे 'कार्यकारी संपादक' अशी नोंद आली असून ती पुढे तशीच राहिली आहे.

पहिल्या अंकातील 'संचालकांचे मनोगत' या मथळ्याखालील लेखात श्री. शंकरराव देव यांनी म्हटले होते की, 'व्यक्तीचा विकास, समाजाची धारणा व उत्कर्ष यांचा समन्वय घालून जीवनातील जे सत्य, शिव व सुंदर त्यांचा साक्षात्कार करून घेण्याचा मार्ग कोणता, ते दाखविण्याचा यथामती, यथाशक्ती प्रयत्न करणे हे 'नवभारता' चे नियोजित कार्य आहे. 'नवभारत' हे पवित्र कार्य "सर्वेषां अविरोधेन" करीत राहील.'

'नवभारता'च्या पहिल्याच अंकात महाराष्ट्रातील त्या वेळच्या आघाडीच्या विद्वानांचे लेख आहेत. आचार्य जावडेकर, डॉ.के.ल. दप्तरी, म.म. दत्तो वामन पोतदार, प्रा.श्री.व्यं. पुणतांबेकर, श्री. शंकरराव मोरे, प्रा. धनंजयराव गाडगीळ ही त्यापैकी काही नावे. मासिकाचे नऊ अंक प्रसिद्ध झाल्यानंतर जुलै १९४८ च्या अंकात 'नवभारता'च्या कार्याविषयी मोजके अभिप्राय प्रसिद्ध केले आहेत. त्यातील एका अभिप्रायात म्हटले आहे "हे मासिक महाराष्ट्रातील थोर विद्वानांच्या विद्वत्तेचे व व्यासंगाचे आल्हाददायक नवनीत आहे ....... सबंध महिनाभर एक एका अंकातील लेख सावकाशपणे चर्वण करावे अशा योग्यतेचे हे मासिक आहे."

परंतु तीन वर्षानंतर श्री. शंकरराव देव यांना त्यांच्या इतर व्यग्रतांमुळे 'नवभारत' चालविणे अवघड झाले. तेव्हा "प्राज्ञपाठशाळा, वाई" या संस्थेने सदर मासिकाची जबाबदारी उचलली. प्रा.वि.म. बेडेकर हेच कार्यकारी संपादक म्हणून काम करीत राहिले. त्यानंतर तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. मे.पुं. रेगे व श्री. वसंतराव पळशीकर यांनी अतिशय नेटाने व मोठ्या वकुबाने 'नवभारता'चे काम अखंड चालविले.

श्री. पळशीकर यांनी संपादनाचे काम सोडल्यानंतर 'नवभारत' मासिकाची हेळसांड झाली हे खेदपूर्वक मान्य केलेच पाहिजे. महिन्यामागून महिने अंक निघू शकले नाहीत. याचा दोष आम्ही कुणा व्यक्तीला देऊ शकत नाही व तशी इच्छाही नाही.

अशा या आणीबाणीच्या काळात 'नवभारता'चे एक 'प्रेमिक', सुप्रसिद्ध विचारवंत आणि प्राज्ञपाठशाळेचे एक वडीलधारे सदस्य प्रा. देवदत्त दाभोलकर आमच्या मदतीला धावून आले. 'ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००५' चा जोडअंक त्यांनी सप्टेंबर २००६ मध्ये प्रसिद्ध केला. त्यांनी, शर्थीचे प्रयत्न करून अंकांची थकबाकी तर भरून काढलीच आणि सप्टेंबर २००७ चा अंक त्याच महिन्यात प्रसिद्ध केला. प्रा. दाभोलकर यांनी केलेल्या अनमोल सहाय्याबद्दल त्यांचे कितीही आभार मानले तरी ते थोडेच होतील.

आता आम्ही ऑक्टोबर २००७ या, म्हणजे ६१ व्या वर्षातील पहिला अंक प्रसिद्ध करत आहोत. हा अंक 'संरक्षण विशेषांक' म्हणून निघत आहे.

आताच्या जगात कोणी देश दुसऱ्या देशाला जिंकून व अंकित करून ठेवील अशी परिस्थिती राहिलेली नाही. सोव्हिएट संघराज्याने ज्या अर्थाने पूर्व युरोपातील देश मांडलिक करून ठेवले होते तसे करण्याची इच्छा किंवा शक्यता आता कुणाला वाटेल, असे दिसत नाही. गेल्या आठ वर्षात अमेरिकेने अफगणिस्तान व इराक हे देश काबीज केले खरे, पण तद्देशीयांची प्रशासने स्थापन करून तेथून काढता पाय घेण्याची तयारी ठेवूनच अमेरिकेने ही आक्रमणे हाती घेतली.

आता जे संरक्षण-विषयक प्रश्न येतात ते प्रत्यक्ष आक्रमणाच्या भीतीबद्दल नसून छुप्या व अस्वस्थता निर्माण करणाऱ्या आक्रमणाविषयी प्रामुख्याने आहेत. हे आक्रमण सतत चालू असते व त्याचा प्रतिकार करण्याचे मुख्य शस्त्र म्हणजे आपल्या राष्ट्राची अधिक बळकट उभारणी करणे आणि सतत जागरूक राहणे हेच आहे. ले.ज. शेकटकर यांनी आपल्या लेखातून हे विस्ताराने व स्पष्ट शब्दात सांगितले आहे.

परराष्ट्रीय संबंधाच्या नव्या कालखंडात भारताला आपली मान ताठ ठेवून व मानाने नांदायचे असेल तर ज्याला 'रोकडे सामर्थ्य' म्हणजे शस्त्रसज्जता म्हणतात ते मिळवण्याची व जपण्याची आवश्यकता आहेच; पण त्याच बरोबर 'मृदु सामर्थ्य' असे ज्याला म्हणतात त्या सामर्थ्याची उपासना ही तितकीच महत्त्वाची आहे. या 'मृदु सामर्थ्या'त काय येत नाही? शिक्षण, कला, नवनिर्मिती, उत्पादकता, शास्त्रप्राविण्य, तंत्रज्ञान, भाषा, परंपरा या सगळ्यांचा समावेश 'मृदु सामर्थ्या'त होतो. इंग्लंड जेव्हा जगभर साम्राज्याचा विस्तार करीत होते, तेव्हा त्याच्यापाशी रोकडे सामर्थ्य तर भरपूर होतेच पण 'मृदु सामर्थ्या'च्या बाबतीतही ते अग्रेसर होते. तेथील मिल, स्पेन्सर यांच्या सारखे तत्त्वज्ञ; डार्विन सारखे नवे सिद्धान्त मांडणारे शास्त्रज्ञ; डिकिन्स, थॅकरे वगैरे प्रभावी कादंबरीकार; इंग्लंडची लोकशाही राज्यव्यवस्था; केंब्रिज ऑक्स्फर्ड सारखी त्रिखंडकीर्तीची विद्यापीठे; मँचेस्टर, लीड्स् येथील विराट कारखाने; तिथला टापटिपीचा व भ्रष्टाचारविरहित राज्यकारभार या साऱ्याचा जगातील सर्व राष्ट्रांना हेवा वाटत होता. इंग्लंडचे साम्राज्य संपले, त्यांच्या रोकड्या सामर्थ्याचा दबदबा विरून गेला तरी ४०-५० वर्षे त्या साम्राज्यापासून स्वतंत्र झालेल्या राष्ट्रांचे आदरणीय नेते इंग्लंडकडे एक प्रकारच्या अचंब्याने पाहत आले ते त्या देशाच्या मृदुसामर्थ्याविषयी त्यांना जे कौतुक वाटे त्यामुळेच.

राष्ट्रबांधणी जसजशी आकार घेऊ लागते तसतसे राष्ट्राचे मृदु सामर्थ्य विकसित होत जाते; आणि राष्ट्राचे मृदुसामर्थ्य जसे वाढते तशी राष्ट्रबांधणी आधिक पक्की होत जाते. या सगळ्याला रोकड्या सामर्थ्याचा आधार असावा लागतो हे खरेच आहे. पण रोकडे सामर्थ्य मिळविणे तुलनेने सोपे आहे. राष्ट्रबांधणी व मृदुसामर्थ्य यांची प्राप्ती होण्यासाठी नेटाने योजनापूर्वक व श्रद्धा बाळगून दीर्घकाळ प्रयत्न करावे लागतात.

'नवभारता'च्या ६१ व्या वर्षात पदार्पण करताना आम्ही नम्रपणे एवढेच सांगण्याचे धारिष्ट करतो की, राष्ट्रबांधणीसाठी आपल्या परीने 'नवभारता'ने आजवर योगदान केलेच आहे. थोरामोठ्यांच्या आशीर्वादाने आणि महाराष्ट्रातील विचारवंतांच्या सहकार्याने हे काम आम्ही चालत ठेवू.

**- संपादक**



# एकात्मिक राष्ट्रीय संरक्षण
## ले. ज. दत्तात्रय शेकटकर (निवृत्त)

'देशाचे संरक्षण म्हणजे देशाच्या सीमांचे संरक्षण' हा समज आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या इतिहासात दीर्घकाळ - म्हणजे दुसरे महायुद्ध संपून गेल्या नंतरही कित्येक वर्षे - प्रचलित होता. आपणास माहीतच आहे की, मध्ययुगात व त्याच्याही पूर्वी संरक्षणासाठी राज्याच्या सीमेवर भक्कम तटबंदी बांधायची किंवा बळकट किल्ल्यांची रांग उभी करायची व त्या रांगेच्या आसऱ्याने प्रजेने आपले व्यवहार चालू ठेवायचे अशी पद्धत होती. काही देशांना निसर्गानेच संरक्षण दिले होते. उदाहरणार्थ, इंग्लंड, जपान या देशांना समुद्राचा वेढा होता. हिंदुस्थानाला उत्तरेला हिमालयाची संरक्षक भिंत व दक्षिणेला समुद्र अशी नैसर्गिक संरक्षण व्यवस्था होती. चीनच्या उत्तरेला डोंगराळ प्रदेश होताच. पण तेवढे संरक्षण पुरेसे न वाटून तेथील राज्यकर्त्यांनी एक प्रचंड संरक्षक भिंत बांधून घेतली. दुसऱ्या महायुद्धापूर्वी फ्रान्सने जर्मनीशी असलेल्या आपल्या सरहद्दीवर झिगफ्रीड नावाची तटबंदी उभारली होती.

तथापि, राष्ट्राचे संरक्षण करायचे म्हणजे सीमेचे संरक्षण करायचे व याचाच व्यत्यास म्हणजे सीमा ओलांडून एका देशाच्या सैन्याने दुसऱ्या देशात घुसणे हेच आक्रमण, या संकल्पना दुसऱ्या महायुद्धाच्या आसपासच निकालात निघाल्या. लष्करी दृष्टिकोणातून पाहायचे तर विमानाचा शोध लागला व नंतर त्याचा युद्धासाठी वापर होऊ लागला तेव्हाच तटबंदीमुळे आक्रमणापासून संरक्षण मिळते, ही कल्पना संपुष्टात आली. नाविक दलाचा विकास, पाणबुड्या आणि विमानवाहू नौका यांचा शोध यामुळे समुद्राच्या वेढ्यामुळे शत्रूला पायबंद बसतो ही समजूत फोल ठरली. दुसऱ्या महायुद्धात जपानने आपल्या विमानवाहू नौका भारताच्या आसपासच्या समुद्रात पाठवून केवढा हाहा:कार माजविला होता याची आठवण अनेक वृद्धांना असेल. आक्रमणाच्या अंगाने विचार केला तरी एका देशाचे सैन्य दुसऱ्या देशात घुसल्यानेच आक्रमण होते ही गोष्ट दुसऱ्या महायुद्धाच्या आगेमागे सोडून द्यावी लागली. जर्मनीने ऑस्ट्रिया हा देश काही सैन्य पाठवून जिंकला नाही. हिटलरने ऑस्ट्रियातील नाझी पक्षाच्या मार्फत ऑस्ट्रियात अशी दहशत माजविली की, ऑस्ट्रिया व जर्मनी यांच्या एकीकरणाचा ठराव मंजूर करणे ऑस्ट्रियाच्या संसदेला भाग पडले.

हिंदुस्थानावर इंग्रजांचे राज्य असताना त्यांनीही हिंदुस्थानाचे संरक्षण म्हणजे त्याच्या सीमांचे संरक्षण हीच भूमिका ठेवली होती. तथापि हिंदुस्थान हा ब्रिटिश साम्राज्याचा भाग असल्यामुळे हिंदुस्थान व इंग्लंड यांच्यातील दळण-वळणाच्या मार्गाचे रक्षण हाही हिंदुस्थानाच्या संरक्षणाचाच भाग असल्याचे ते मानत होते. तसेच हिंदुस्थानच्या सीमांचे रक्षण करायचे ते सरहद्दीच्या आत राहून नव्हे तर बाहेर जाऊन, लष्करी ठाणी उभारून करावयाचे, हे त्यांचे धोरण होते. यासाठी सिंगापूर, अंदमान, कोलंबो इथे त्यांनी नाविक तळ उभारले. एडन, सुवेझ कालवा, माल्टा, जिब्राल्टर इथे सैनिकी तळ उभारले. अफगाणिस्तानावर व नेपाळवर नियंत्रण ठेवले. स्वातंत्र्यानंतर आपल्या संरक्षणविषयक धोरणाचा गाभा हाच होता की, राष्ट्राच्या सीमांचे रक्षण म्हणजेच राष्ट्राचे रक्षण. काश्मिरवर पाकिस्तानचे आक्रमण झाले तेव्हा आपण पंजाबातील आंतरराष्ट्रीय सीमा ओलांडली, (१९६५) ती मात्र धोरणाचा परिपाक म्हणून.

तथापि गेल्या तीस वर्षात आक्रमण आणि संरक्षण यांच्या बाबतीत फार वेगळे अनुभव आपण आणि साऱ्या जगाने घेतले. त्यातून या दोन्ही संकल्पनांचा मूलगामी पुनर्विचार करण्याची गरज निर्माण झाली.

### (१)

एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राच्या प्रदेशाचा कब्जा घ्यावा व तो प्रदेश किंवा संपूर्ण देश आपल्या ताब्यात ठेवावा, शत्रुराष्ट्राकडून जबरदस्त खंडणी घ्यावी किंवा

दुसऱ्या देशाला मांडलीक म्हणून वागवावे अशी स्थिती आता उरली नाही. जागतिक मतप्रवाह, बड्या देशांची दडपणे, ताबा घेतलेल्या प्रदेशातील जनतेत धुमसणारी अस्वस्थता या सगळ्यापुढे जेत्या देशाला मान तुकवून जिंकलेला प्रदेश सोडून द्यावा लागतो. सोव्हिएट संघराज्याने सैन्य पाठवून अफगाणिस्तानावर ताबा मिळविला व तेथे आपले हस्तक असणारे सरकार स्थापन केले. पण नंतर सोव्हिएट संघराज्याला तेथून माघार घ्यावी लागली. अमेरिकेने इराक हा देश जिंकला. तेथे अमेरिकेला अनुकूल असणाऱ्या लोकांचे सरकार बनविले. आता अमेरिकेला तेथून लवकर काढता पाय कसा घ्यावयाचा याची विवंचना लागली आहे. इझ्राएलने शेजारच्या अरब राष्ट्रांचे डावपेचांच्या दृष्टीने मोक्याचे प्रदेश पुनः पुनः जिंकून घेतले; पण नंतर या ना त्या सबबीवर त्यांनी ते सोडून दिले. १९६५ च्या लढाईत व १९७१ च्या लढाईतही पाकिस्तानचा जो प्रदेश मग तो पाकव्याप्त काश्मीर मधला का असेना-आपण जिंकला, तो नंतरच्या तहात आपण सोडून दिला. या सर्व उदाहरणांचा निष्कर्ष असा की, प्रदेश जिंकून घेण्यासाठी आक्रमण हे आक्रमणाचे स्वरूप आता राहिलेले नाही.

शत्रुराष्ट्राकडून खंडणी उकळणे किंवा त्याचे लष्करी सामर्थ्य खच्ची करून त्याची पुनः उभारणी होऊ न देणे ही देखील आक्रमणाची उद्दिष्टे एके काळी असत. १८७० साली जर्मनीने फ्रान्सचा पराभव केला तेव्हा जर्मनीने फ्रान्सकडून प्रचंड खंडणी वसूल करून घेतली. तीच गोष्ट पहिल्या महायुद्धानंतर जेत्या दोस्त राष्ट्रांनी जर्मनीच्या विषयात केली. पहिल्या महायुद्धानंतर दोस्त राष्ट्रांनी जर्मनीने पुनः लष्कर उभारू नये अशा अटी असणारा तह जर्मनीवर लादला. दुसऱ्या महायुद्धानंतर तर जेत्या दोस्त राष्ट्रांनी जर्मनी व जपान या पराभूत राष्ट्रांना लष्करे उभीच करता येणार नाहीत अशा तरतुदी त्यांच्या घटनांतच नोंदविल्या. पण आता अनुभव असा आला की, या प्रकारचा उघड अत्याचार जित राष्ट्रे सहन करीत नाहीत. खंडणी वसूल करून घेता येत नाही; व जेती राष्ट्रेच जित राष्ट्राला स्वहितासाठी सैन्य तयार करायला उत्तेजन देतात.

(२)

पण याचा अर्थ असा नव्हे की, आक्रमण ही संकल्पनाच आता मोडीत निघाली आहे. आता जी आक्रमणे चालतात ती उघड उघड लष्करी आक्रमणे नसतात तर भूमिगत व दीर्घकाळ चालणारी आक्रमणे केली जातात. त्यांचे काही प्रकार खालील प्रमाणे सांगता येतील.

<u>प्रकार पहिला</u> :- स्वतःच्या देशाचे नागरिक शत्रूच्या देशात किंवा संलग्न प्रदेशात या ना त्या मिषाने घुसवून तेथेच त्यांची वसणूक करायची. अशा रीतीने घुसखोरी करणारे हे परके लोक यजमान राष्ट्राला कायमचे त्रासदायक होऊन बसतात. बांगला देशाची प्रजा आसाम, बंगाल, बिहार या भारताच्या बांगला देशाशी संलग्न प्रदेशात घूसखोरी करून राहिली आहे इतकेच नव्हे तर मुंबई, हैद्राबाद, बंगलोर या दूरच्या शहरातही त्यांनी वसाहती केल्या आहेत. त्यांच्यातील बरेच लोक दहशतवादी कारवायांना पाठिंबा देतात, ह्याचे पुरावे देखील आपल्याला मिळाले आहेत. नेपाळातील गुरखे बंगाल, ईशान्येकडील राज्ये, बिहार इकडे येऊन कायमचे राहिले आहेत. बंगाल मधील नेपाळी लोकांनी स्वतंत्र राज्यासाठी हिंसक चळवळ केली होती. अखेर प्रादेशिक स्वायत्ततेवर त्यांना समाधान मानावे लागले, हे आपण अनुभवले आहेच.

<u>प्रकार दुसरा</u> :- आपण असे समजतो की, आधुनिक जगात धर्म ही कालबाह्य संकल्पना झाली असली तरी तिचे सामुदायिक रूप कालबाह्य झाले नाही. पण गेल्या पंचवीस तीस वर्षांचा अनुभव असा आहे की, मुख्यतः आदिवासी टोळ्यांत धर्मांतर घडवून आणण्याचा प्रयत्न मोठ्या प्रमाणावर होतो आहे. धर्मांतर झाले की, धर्मांतरित लोकांना आपण वेगळे आहोत याची तीव्र जाणीव होते आणि हे वेगळेपण स्वतंत्र राष्ट्राच्या स्वरूपात व्यक्त व्हावे, असे वाटू लागते. याला आपण धार्मिक आक्रमण असे म्हणू. याचा अनुभव आपण ईशान्येकडील राज्यात घेतला आहेच. पण धार्मिक आक्रमणाचे एक उपांगही आहे. युगोस्लाव्हियात मुसलमान व ख्रिश्चन लोक कायम एकत्र राहात होते. पण मुसलमानात आपल्या

धर्मामुळे आपण वेगळे राष्ट्र आहोत अशी भावना उत्पन्न झाली व ते युगोस्लाव्हियाचे विभाजन करून मागू लागले. आपल्याकडील काश्मिरची समस्या ही देखील धार्मिक आक्रमणाचेच अपत्य आहे. काश्मिरातील लोक मूळ पासून मुसलमान आहेत खरे; पण वेगळ्या धर्मामुळे आपण वेगळे राष्ट्र आहोत ही भावना त्यांच्या ठिकाणी पंचवीस वर्षांपूर्वी नव्हती. परकीय प्रचारामुळे म्हणा किंवा चिथावणीखोरांनी भडकविल्यामुळे म्हणा गेली वीस वर्षे आपणास तेथील दहशतवादाला तोंड द्यावे लागते आहे. पंजाबातील शिखांचा दहशतवाद आपण ९४-९५ साली मोठ्या शर्थीने व फार मोठी किंमत देऊन शांत केला आहे. १९११ च्या जनगणनेत पहिल्यांदा शिखांची 'हिंदूपेक्षा निराळे' अशी वर्गवारी झाली. तोपर्यंत शीख हा हिंदूधर्मातीलच एक पंथ म्हणून गणला जायचा. पण एकदा शीख पंथाला वेगळा धर्म अशी मान्यता दिल्यानंतर त्यांच्यातील कट्टर धर्मवाद्यात फुटीरतावाद बोकाळला. त्याचे घातक परिणाम १९८० सालापासून पुढे १५ वर्षेपर्यंत आपल्याला भोगावे लागले.

<u>प्रकार तिसरा</u> :- शत्रुराष्ट्राच्या आर्थिक विकासात अडथळे निर्माण करणे हा सुद्धा आक्रमणाचा एक प्रकार मानला पाहिजे. शत्रूच्या प्रदेशातील ज्या भागात आर्थिक विकासाला पोषक अशी नैसर्गिक साधनसामग्री भरपूर प्रमाणात उपलब्ध आहे त्या भागात अस्वस्थता माजविणे, उद्रेकी परिस्थिती निर्माण करणे असे या आक्रमणाचे स्वरूप असते. आपल्याकडे नक्षलवाद्यांचा बुजबुजाट बिहार, झारखंड, बंगाल, ओरिसा, छत्तीसगढ, नागविदर्भ आणि आंध्रचा पूर्व किनारा या भागात झाला आहे. हा सर्व भाग वनसंपत्ती, खनिजसंपत्ती यांनी संपन्न असून पर्यटनाच्या विकासाला अनुकूल आहे. परंतु गेली चाळीस वर्षे या भागात नक्षलवाद्यांनी धुमाकूळ घातल्यामुळे तेथे उद्योगधंदे, वीजनिर्मिती, दळण-वळण व पर्यटन यांचा विकास झाला नाही. हा प्रदेश आदिवासींचा आहे. औद्योगिक प्रगती न झाल्याने आदिवासींना रोजगार नाही. त्यामुळे वैतागून ते नक्षलवाद स्वीकारून अतिरेकी होतात आणि नक्षलवादाच्या धाम-धुमीमुळे येथे औद्यागिक विकास होत नाही, असे हे दुष्टचक्र आहे. दहशतवादी हल्ल्यांचा उद्देश आर्थिक विकासाला खीळ घालण्याचाही असतो. त्यामुळे औद्योगिक दृष्टीने पुढारलेल्या मुंबई, हैद्राबाद, बंगलोर अशा शहरात आत्मघातकी बॉम्बहल्ले होतात. हे सर्व छुपे आक्रमण असून खडे सैन्य या आक्रमणाला प्रतिबंध करू शकत नाही.

<u>प्रकार चौथा</u> :- दहशतवादी हल्ले हे आक्रमणाचे चौथे रूप आहे. आपण वर पाहिलेच आहे की, उद्योगप्रधान शहरात हल्ले घडवून आणण्यामागे अर्थव्यवस्थेला खिळ-खिळी करणे हा उद्देश असतो. पण त्याहीपेक्षा देशात अस्वस्थता माजविणे, लोकात परस्परांविषयी संशय पसरविणे, समाजात असुरक्षितता निर्माण करणे असे दहशतवादी हल्ल्यांचे हेतू असतात. दहशतवादी बॉम्ब हल्ले कोणा विशिष्ट व्यक्तीला किंवा समूहाला लक्ष्य ठरवून होत नाहीत; तर ते सर्रहा होत असतात. आक्रमणाची ही जी छुपी रूपे अनुभवाला येत आहेत त्यांच्या पृष्ठभूमीवर संकल्पनाही बदलली आहे. 'जनतेच्या मनात असलेली आपल्या सुरक्षिततेची खात्री' हेच खरे संरक्षण आहे, ही खात्री डळमळीत करणे हा दहशतवादाचा हेतू असतो.

<u>प्रकार पाचवा</u> :- शत्रूच्या देशातील गुन्हेगारीला प्रोत्साहन देणे हे आक्रमणाचे पाचवे रूप आहे. हे गुन्हेगार देशाचे नागरिक असतात. देशातील कायद्यांची बेधडक पायमल्ली करून, अश्राप लोकांना लुबाडून किंवा त्यांच्यावर अत्याचार करून, हाताशी कोणताही गुन्हा करण्याची तयारी असणाऱ्या गुंडांच्या टोळ्या बाळगून त्यांनी आपला दरारा बसविलेला असतो. या गुन्हेगारांचे पोलीस, राजकारणी, प्रसिद्धीच्या वलयात असणाऱ्या व्यक्ती यांच्याशी निकटचे संबंध असतात. अशा खतरनाक गुन्हेगारांना पैसे व शस्त्रास्त्रे पुरवून, त्यांनी गोळा केलेल्या पैशाला आपल्या देशात गुंतवणूकीसाठी अवसर देऊन, प्रसंगी त्यांना आपल्या देशात आश्रय देऊन आक्रमक राष्ट्र या गुन्हेगारांना आपल्या हवाली राखते व आपले लक्ष्य झालेल्या राष्ट्राला खिळखिळे करून सोडते.

आक्रमणाचे हे नवे प्रकार असे आहेत की, त्यासाठी आक्रमक राष्ट्राला आपल्या सैन्याचा उपयोग करावा लागत नाही, शस्त्र उचलावे लागत नाही आणि 'आक्रमक देश' म्हणून जागतिक मताच्या निंदेचा विषय व्हावे लागत नाही. आक्रमणाचा उद्देश जो की, शत्रुराष्ट्र

दुबळे व्हावे, तो मात्र सिद्धीस जात असतो. या आक्रमणाचा बळी ठरलेले राष्ट्र या आक्रमणाचा प्रतिकार स्वतःच्या सैन्यामार्फत करू शकत नाही; कारण या आक्रमणाचे प्रत्यक्ष कर्ते हे आक्रमित राष्ट्राचे नागरिक असतात किंवा फुटकळ व्यक्ती असतात. आपली सैन्याबद्दलची जी परंपरागत कल्पना आहे तीत गुन्हेगारीविरुद्ध सैन्याचा उपयोग ही गोष्ट बसत नाही. याचा अर्थ असा नाही की, खडे सैन्य आता निरूपयोगी ठरले आहे. गणवेषधारी व प्रशिक्षित सैन्य सुसज्ज ठेवावेच लागणार.

आक्रमणाच्या या नव्या प्रकारांचे वैशिष्ट्य हे आहे की, शत्रुराष्ट्राचे सर्व अंगांनी खच्चीकरण करून त्याला दुबळे करून सोडायचे; मग कागदावर ते राष्ट्र कितीका सामर्थ्यशाली असे ना. याचा आणखी एक परिणाम असा आहे की, या छुप्या युद्धाचा आश्रय करून लहान व सकृत्दर्शनी दुबळे वाटणारे देशही बळवंत देशांना टेकीला आणू शकतात. अफगाणिस्तानातील कट्टरवाद्यांनी सोव्हिएट संघराज्याला असेच नमविले. व्हिएटनामने अमेरिकेची युद्ध करण्याची उबळ याच प्रकारे, व्हिएटनाम-मधील अमेरिकन सैन्याला भंडावून सोडून, मारून टाकली.

(३)

नवीन तंत्रज्ञानाने पारंपरिक युद्धाचे रूपही पार बदलून टाकले आहे. दोन देशांची सैन्ये समरांगणात परस्परांना भिडली आहेत, एकमेकांवर बॉम्ब, हातबॉम्ब, तोफगोळे किंवा बंदुकीच्या गोळ्या झाडत आहेत, सुरूंग पेरून रस्त्यावरून जाणारे सैन्याचे जथे व त्याना वाहून नेणारी वहाने यांना उडवून टाकीत आहेत अशा पद्धतीचे युद्ध आता होण्याची शक्यता फारच कमी आहे. १९६२ साली चीनशी व १९६५ आणि ७१ साली पाकिस्तानशी आपण अशा लढाया लढलो. आजही काही स्थानिक चकमकीत अशा प्रकारची गोळागोळी होते. पण आता जर भारत-पाक किंवा भारत-चीन युद्धाला तोंड लागले तर दोन्ही देश परस्परांच्या महत्त्वाच्या शहरांवर क्षेपणास्त्रांचा मारा करून शहरे उद्ध्वस्त करून टाकतील; लष्करी विमानतळ नष्ट करतील, रस्ते व लोहमार्ग उडवून देतील आणि वाहतूक बंद पाडतील. युद्धाची आपत्ती सीमावर्ती प्रदेशापुरती मर्यादित राहणार नाही तर संपूर्ण देश व त्याचे सर्वस्व लढाईच्या भक्ष्यस्थानी पडेल. या अर्थाने हे युद्ध सर्वंकश आणि सर्वव्यापी होईल.

अत्याधुनिक तंत्रज्ञानाने तर युद्धाचे अनेक नवीन प्रकार उपलब्ध झाले आहेत. उभी पिके जाळून नाहीशी करता येतील तसेच उंच उंच इमारती जमीनदोस्त होतील, अशी मारक अस्त्रे शोधून काढली आहेत. या युद्धात मनुष्यहानीपेक्षा शत्रूची संपत्ती नाहीशी करण्यावर भर असतो. उलट जैविक अस्त्रे (बायॉलॉजिकल वेपन्स) सोडून शत्रुराष्ट्रात रोगराई पसरविता येते आणि रासायनिक अस्त्रे वापरून शत्रूच्या देशातील वातावरण विषारी करता येते. शत्रूच्या हालचालींची, त्याच्या कडील नवीन तंत्रज्ञानाची व शस्त्रांची माहिती आता लपून राहत नाही. उपग्रहांच्या द्वारे पृथ्वीच्या पाठीवरील प्रत्येक तसू-तसू जागेत काय चालले आहे, याची तपशीलवार माहिती मिळते. तेव्हा आपण काही अत्याधुनिक अस्त्र शोधून काढू, ते शत्रूपासून दडवून ठेवू व त्याचा अचानक उपयोग करून शत्रूस शरण आणू अशा प्रकारची मनोराज्ये आता फोल आहेत. आता फक्त गोष्ट गुप्त राहाते, ती म्हणजे आपण आपल्या शस्त्रांचा कुठे, केव्हा व कसा वापर करणार या विषयीच्या आपल्या योजना.

भूमियुद्ध हे प्राचीन काळापासून मनुष्याला माहीत आहे. पाच-सातशे वर्षांपासून सागरी युद्धाची कल्पना माणसाला आली. नाविक दलाचा उपयोग करून शत्रुराष्ट्राचा व्यापार बंद पाडावयाचा व त्याला शरण आणायचे या तंत्राचा वापर, १८ व्या शतकात, इंग्लंडने फ्रान्सविरूद्ध केला. पहिल्या महायुद्धाच्या अखेरीला हवाई युद्धाची नांदी झाली; आणि दुसऱ्या महायुद्धात तर जर्मनीने इंग्लंडवर बॉम्बफेक्या विमानांच्या झुंडीच्या झुंडी पाठविल्या. आता आपण अंत ठयुद्धाची आखणी करू शकतो. शत्रुराष्ट्राला आपल्या लष्करी हालचालींची माहिती हेरगिरी करणाऱ्या उपग्रहांच्या मार्फत होते. तेव्हा युद्ध सुरू होताच प्रत्येक देश शत्रूचे उपग्रह पाडून टाकण्यासाठी आपली क्षेपणास्त्रे सोडील. तसेच आपल्या उपग्रहावर चाल करून येणारी क्षेपणास्त्रे वाटेतच फोडून टाकण्यासाठीही क्षेपाणास्त्रे टाकावी लागतील. युद्धाची ही प्रलयंकारी रूपे आपण नीट समजून घेतली पाहिजेत.

प्रत्यक्ष युद्ध हे अतिभीषण व पराकाष्ठेचे संहारक झाले असल्यामुळे प्रत्यक्ष युद्धात शत्रूला पराभूत करावयाचे ही कल्पना मागे पडत चालली आहे. या उलट वर सांगितलेल्या छुप्या आक्रमणांचा उपयोग करून शत्रूचे आर्थिक खच्चीकरण करणे, त्याला जेरीला आणणे व अखेर निर्बळ करून सोडणे हे जास्त फायद्याचे ठरू लागले आहे. सोव्हिएट संघराज्याचा पाडाव करण्यासाठी अमेरिकेला प्रत्यक्ष युद्ध असे कधी करावे लागले नाही. हंगेरी, चेकोस्लोव्हाकिया या देशात सोव्हिएट सैन्य घुसले तेव्हाही अमेरिकेने युद्धाच्या स्वरूपाची हालचाल केली नाही. सोव्हिएट संघराज्याने अफगाणिस्तानात सैन्य पाठविले त्याच्या विरूद्ध देखील अमेरिकेने लष्करी पाऊल उचलले नाही. १९७५ पासून असे चित्र होते की, सोव्हिएट संघराज्य आणि अमेरिका यांनी आपापली प्रभावक्षेत्रे निश्चित केली होती; शीतयुद्ध आता संतुलनास्थितीला पोचले होते आणि ही स्थिती दीर्घकाळ तशीच राहाणार असे वाटत होते. पण ८० च्या दशकाच्या अखेरीला सोव्हिएट संघराज्याचा डोलारा पत्त्याच्या वाड्याप्रमाणे कोलमडला. सोव्हिएट संघराज्याच्या वर्चस्वाखालील पोलंड, रूमानिया, हंगेरी, चेकोस्कोव्हाकिया इत्यादी राष्ट्रातील हुकूमशाही राजवटी विलयाला गेल्या आणि खुद्द सोव्हिएट संघराज्याचे विघटन झाले. या सर्व घटनांची रूपरेषा अमेरिकेच्या युद्धतज्ज्ञांनी १९५४ सालीच तयार केली होती. सोव्हिएट संघराज्याला ईर्षेला घालून लष्करावर अवाच्या सवा खर्च करायला लावायचा, हे या योजनेचे बीज होते. या खर्चाच्या वाढत्या बोजामुळे सोव्हिएट प्रजेच्या मूलभूत गरजा व उपभोगाच्या इच्छा भागविण्यासाठी पैसे कमी पडतील. जनतेतील असंतोष वाढत जाईल व त्या दडपणाखाली सोव्हिएट संघराज्याचे विघटन होईल, असा कयास होता.

(४)

प्रत्यक्ष युद्धाची भयानकता, युद्धाचा अवलंब न करता शत्रूला नामोहरम करण्यासाठी वापरले जाणारे छुप्या आक्रमणाचे स्वरूप, संरक्षण या संकल्पनेचा यापूर्वी स्पष्ट केलेला अर्थ यांच्या पृष्ठभूमीवर आपल्याला भारताच्या स्थितीचे विश्लेषण करावयाचे आहे. हे स्पष्टच आहे की, भारतीय नागरिकाच्या मनात आपण सुरक्षित आहोत अशी निरपवाद भावना आज उरलेली नाही. काश्मिरात घूसखोरांचे हल्ले थेट लष्करी छावण्यांवर होतात, भारताच्या संसद-भवनाच्या आवारात दहशतवादी घुसले होते, १९९३ साली मुंबईला गर्दीच्या ठिकाणी बॉम्बस्फोट झाले व त्यात २५० माणसे मेली, देवळांवर अतिरेक्यांनी हल्ले केले; नक्षलवाद्यांनी सरकारी अधिकाऱ्यांना पळवून न्यावे व त्यांच्या सुटकेच्या बदल्यात आधी पकडलेल्या नक्षलवाद्यांच्या सुटकेची मागणी करावी ही वारंवार घडणारी गोष्ट आहे; बिहारात अपहरण-कर्त्यांच्या टोळ्या आहेत आणि त्या मुलांना व मोठ्या मनुष्यांनाही पळवून नेतात. आणि खंडणीची मागणी करतात, ही रोजची गोष्ट झाली आहे; दावूद इब्राहिम, अबु सालेम इत्यादी गुन्हेगारी जगातील सरदारांची नावे सर्वांच्या तोंडी आहेत आणि त्यांचे चित्रपटसृष्टीशी घनिष्ठ संबंध आहेत अशा पुराव्यासकट बातम्या दूरचित्रवाणीवरील वाहिन्यांवर दाखविल्या जातात. हे सर्व ध्यानात घेता सामान्य नागरिकाला वित्त व जीवित यांच्या सुरक्षेविषयी दारूण काळजी वाटते आहे, असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

असे असले तरी आपल्या खात्यावर जमेच्या बाजूला काही उपलब्धी आहेत त्यांच्याकडे दुर्लक्ष करता येणार नाही. पंजाब राज्यात पराकोटीला पोचलेला दहशतवाद व फुटीरतेची आकांक्षा आपण संपवून टाकली आहे. काश्मिरमध्ये पाकिस्तानातून अतिरेक्यांचे हल्ले होतात, धर्मभावनेचा आधार घेऊन तेथील जनतेला फुटीरतेची चिथावणी दिली जाते. ह्या गोष्टी आता वीस वर्षे चालू आहेत. तथापि काश्मिर अद्याप भारताचा अविभाज्य भाग राहिला आहे. अनेक अस्मानी व सुलतानी संकटांशी सामना देत आपण एके काळी सातत्याने २।। टक्क्यांवर राहिलेला आपला विकासदर ८ टक्क्यांच्या वर पोचविला आहे. अमेरिकन गव्हाने भरलेली बोट मुंबईला लागल्याखेरीज नागरिकाच्या पानात पोळी पडत नव्हती अशा स्थितीतून बाहेर पडून आपण अन्नधान्यांची निर्यात करू लागलो. अंतराळ संशोधन, आण्विक संशोधन, नवीन तंत्रज्ञान, कृषिसंशोधन या क्षेत्रात काम करणारा प्रशिक्षित तरुणांचा मोठा वर्ग आपल्याकडे आहे. देशातील

३५ कोटी लोकसंख्येचा विस्तृत ग्राहकवर्ग ही जगातील उत्पादकांच्या दृष्टीने स्पृहणीय बाजारपेठ आहे. ही बाजारपेठ सुरक्षित व संपन्न राहावी यात या उत्पादक वर्गाचे आणि त्यामुळे उत्पादकांच्या राष्ट्रांचे हित आहे. याहून विशेष म्हणजे गेल्या साठ वर्षांत अनेक संकटांना तोंड देऊन आपण देशाचे ऐक्य, लोकशाही राज्यपद्धती आणि धर्म-निरपेक्षता ह्या गोष्टी शाबूत राखल्या आहेत. चीन, अमेरिका, युरोप, जपान व पूर्व-आशियाई देश या संपन्न राष्ट्रांना भारताशी व्यापार करण्याची इच्छा होते व व्यापार करण्यात, इतकेच नव्हे तर येथे भांडवल गुंतविण्यात विश्वास वाटतो त्याचे कारण गेल्या साठ वर्षात आपण केलेली प्रशंसनीय प्रगती हेच आहे.

भारताचे मोक्याचे भौगोलिक स्थान हे देखील भारताच्या आर्थिक व सामाजिक महत्त्वाला पोषक आहे. औद्योगिक क्रांतीनंतरच्या गेल्या अडीचशे वर्षात जगातील घडामोडींचा केंद्रबिंदू युरोप हा होता. आता हे केंद्र पूर्वेकडे सरकले आहे. चीन व भारत या देशात फार मोठा व वयाने तरुण आणि उद्यमशील असा ग्राहकवर्ग नांदतो आहे. चीन, कोरिया (उत्तर व दक्षिण), जपान व भारत या देशातून उद्योगधंदे व सेवा यांची वेगाने वाढ होते आहे. पूर्वेकडील देश व युरोप यांच्यातील मालाची वाहतूक हिंदी महासागर, सुवेझ कालवा व भूमध्य समुद्र या मार्गाने होते. या वाटेच्या आसपास थायलंड, भारत व इझ्राएल असे फक्त तीन बिगर इस्लामी देश आहेत. आज नाना कारणांनी इस्लामी समाज व पाश्चात्त्य राष्ट्रे यांच्यात वैरभाव निर्माण झाला आहे. अमेरिकेने अफगाणिस्तान व इराक हे देश ताब्यात घेतले. त्यावेळी अमेरिकेला युरोपने पाठिंबाच दिला. सध्या अमेरिकेची इराणला दमदाटी चालू आहे व त्याही बाबतीत युरोपची अमेरिकेला साथच आहे. या साऱ्या घटना हेच सांगतात की इस्लामी जनतेच्या दहशतवादाची धास्ती पाश्चात्यांनी घेतली आहे. चीनला देखील इस्लामी दहशतवादाची भीती आहेच. अशा या भौगोलिक-राजकीय पटावर भारताला मोक्याचे स्थान सहजच लाभले आहे. भारताला खिळखिळे करण्यापेक्षा तो एकसंघ आणि संपन्न राहील तरच आपले आर्थिक संबंध अबाधित राहतील ही जाणीव या पाश्चात्त्य व पौर्वात्य राष्ट्रांना सतत राहील अशी दक्षता आपण घेतली पाहिजेच; पण त्याचवेळी आपण इस्लामी राष्ट्रांचे शत्रू नाही याची ग्वाही इस्लामी देशांना दिली पाहिजे.

एका बाजूला युरोप व अमेरिका यांच्या सारखे संपन्न प्रदेश व दुसऱ्या बाजूला नव्याने परंतु झपाटयाने विकास पावणारे चीन, कोरिया यांच्या सारखे देश यांच्यातील दळण-वळणाच्या वाटेवर स्थान मिळालेले असल्याने भारताला जसे फायदे मिळतात तशा काही जबाबदाऱ्याही येतात. या व्यापाराचे संरक्षण करणे ही त्यातील सर्वात महत्त्वाची जबाबदारी आहे. याच मार्गाने अमली पदार्थांचा व्यापार चालतो, अरबी चाच्यांची पैरवी असते. व्यापारात गुंतलेल्या राष्ट्रांनी ज्यांचे वैर घेतले आहे अशी इस्लामी राष्ट्रे या समुद्राच्या किनाऱ्यावर आहेत. तेव्हा हिंदी महासागराचे संरक्षण करण्यासाठी प्रबळ नौसेना आपल्याला बाळगावी लागणार हे स्पष्ट आहे. हा सागरी मार्ग आज श्रीलंकेच्या दक्षिणे कडून जातो; कारण भारत व श्रीलंका यांच्या मधील पाल्कची सामुद्रधुनी मोठया जहाजांना जाता येईल इतकी खोल नाही. भारताच्या पूर्व व पश्चिम किनाऱ्यांना जोडणारा व लंका आणि भारत यांच्या मधून जाणारा सागरी मार्ग तयार करण्याची कल्पना दळण-वळणाच्या मार्गाची लांबी कमी करण्याच्या दृष्टिकोणातून चांगली आहे व त्यामुळे या व्यापारावरील भारताचे नियंत्रण वाढेल, तसेच त्याचे महत्त्वही वाढेल.

जहरी व छुप्या आक्रमणाला तोंड देण्याचा प्रभावी मार्ग हाच की, भारताला दुबळे करण्यापेक्षा त्याला समर्थ व संपन्न राखणेच हितावह आहे, असे आक्रमणाची इच्छा बाळगणाऱ्या राष्ट्राला वाटले पाहिजे. शीत युद्ध चालू होते तोपर्यंत पाश्चात्त्य देशांना अशी धास्ती वाटे की, भारत सोव्हिएट संघराज्याच्या गोटात जाईल व आपल्याला डोईजड होऊन बसेल. त्यामुळे काश्मिर, बांगला देश, पाकिस्तान याच्या संबंधात उद्भवलेल्या तंट्यांच्या बाबतीत पाश्चात्त्य राष्ट्रांनी भारत-विरोधी भूमिका घेतली. पाकिस्तानला शस्त्रास्त्रे पुरवून भारताला सैन्यावर जास्त खर्च करावा लागेल अशी काळजी घेतली. पण शीत युद्ध संपल्यानंतर पाश्चात्त्यांचे धोरण बदलले आहे. भारत हे प्रबळ व संपन्न राष्ट्र होणे आपल्या हिताचे आहे, असे त्यांना पटू लागले आहे. त्यामुळेच अमेरिकेने भारताशी अणुसहकार्य-करार करण्याची उत्सुकता दाखविली.

(५)

हिमालयाच्या दक्षिणेला आशिया खंडाचा जो भाग आहे, त्याला दक्षिण आशिया असे म्हणतात. पाकिस्तान, नेपाळ, भूतान, बांगलादेश, म्यानमार, श्रीलंका, मालदीव व भारत हे देश या प्रदेशात येतात. इतिहास, संस्कृती, परंपरा, भौगोलिक सान्निध्य आणि उत्पादने या दृष्टींनी विचार केला तर हे देश परस्परांशी इतके जखडलेले आहेत की त्यांचा एकत्रच विचार करावा लागतो. आकार, लोकसंख्या, नैसर्गिक साधनसंपत्ती, आर्थिक व सामाजिक प्राबल्य आणि सांस्कृतिक वर्चस्व यांचा विचार केला तर या भागातील महासत्ता होण्याची ईर्षा फक्त भारतच धरू शकतो, हे स्पष्टच आहे. त्यामुळे दक्षिण आशियात लवकरच भारत एक महासत्ता म्हणून वावरू लागेल, अशी अपेक्षा अनेक तज्ज्ञ व राजकीय नेते बोलून दाखवत असतात.

भारताच्या राज्यकर्त्यांनी, काही विशिष्ट प्रसंगी, आपण ही जबाबदारी घेऊ शकतो असे दाखवून दिले आहे. नेपाळचे राजे त्रिभुवन यांच्या विरोधात १९५२ साली उठाव झाला व राजे त्रिभुवन भारतात आश्रयाला आले. आपण त्यांच्या मदतीला सैन्य देऊन त्यांची नेपाळच्या राजपदावर पुनः स्थापना केली. बांगला देशाच्या स्वातंत्र्य-युद्धात आपल्या सैनिकी मदतीमुळेच बांगला देश यशस्वी झाला. भूतानचे परराष्ट्र धोरण व आंतरराष्ट्रीय व्यापार यांच्यावर भारताचे नियंत्रण आहे. श्रीलंकेत तामिळ बंड-खोरांच्या विरोधात, श्रीलंकेच्या सरकारच्या मागणीवरून, आपण सैन्य पाठविले होते. मालदीव बेटात बंड झाले तेव्हा आपल्या सैन्याने जाऊन बंड मोडून टाकले. या उदाहरणांवरून हे स्पष्ट होते की, दक्षिण आशियात जेव्हा समस्या उत्पन्न होतात तेव्हा भारत काय करतो किंवा करत नाही, याला विशेष महत्त्व प्राप्त होते.

पण ही एक दुर्दैवी परिस्थिती आहे की, आपल्या शेजारी राष्ट्रांना आपला आधार वाटण्यापेक्षा आपला दुस्वासच जास्त वाटतो. भारत बलिष्ठ न होता दुबळा राहावा, संपन्न न होता कंगाल असावा, आंतरराष्ट्रीय राजकारणात त्याच्या मताला व धोरणाला महत्त्व येण्यापेक्षा त्याची मानहानी व्हावी, अशीच भूमिका या राष्ट्रांनी वारंवार घेतलेली आढळते. १९६२ साली चीन व भारत यांच्यात सीमेवरून वाद चालू असताना नेपाळची स्थिती डळमळीत झाली व भारताच्या बाजूने उभे राहण्यापेक्षा चीनशी त्यांनी स्वतःच्या सीमेबाबत करारच करून टाकला. नेपाळमधील माओवाद्यांनी सध्या उत्तर प्रदेश व बिहार येथे आपले प्रभावक्षेत्र पसरविले आहे. बांगला देशी घूसखोरांनी भारतात माजविलेला कहर आपण अनुभवतोच आहोत. म्यानमार (ऊर्फ पूर्वीचा ब्रह्मदेश) हा देश पूर्णपणे चीनच्या कह्यात गेला आहे. म्हणजे पाकिस्तानसारख्या भारताशी जन्मसिद्ध शत्रुत्व असणाऱ्या देशाची गोष्ट सोडली तरी इतर देशांनाही असे वाटत नाही की, प्रबळ व संपन्न भारताशी घनिष्ट संबंध जोडावेत व आपणही भरभराटीचा सुपंथ स्वीकारावा.

पाकिस्तानची गोष्ट निराळीच आहे. त्याच्या उत्पत्तीपासूनच तो देश जगातील महासत्तांचा लाडका देश होऊन राहिला आहे. शीत युद्धाच्या काळात सोव्हिएट संघराज्य व त्याच्या दक्षिणेकडील अंकित राष्ट्रे यांच्यावर रोखलेले पिस्तूल म्हणून पाश्चात्त्य राष्ट्रांना पाकिस्तानचे महत्त्व वाटत असे. अमेरिकेने सोव्हिएट संघराज्याला अटकाव करण्यासाठी घडवून आणलेल्या 'सीटो' आणि 'बगदाद' करारात पाकिस्तान सामील झाले. आधुनिक शस्त्रे व आर्थिक मदत यांच्या योगाने आपण भारताशी स्पर्धा करू अशी महत्त्वाकांक्षा पाकिस्तानने धरली व भारताशी घोषित व अघोषित अशी चार युद्धे त्याने केली. बांगला देश निराळा झाल्यावर पाकिस्तानची ही खुमखुमी जिरली.

सोव्हिएट संघराज्याला देखील पाकिस्तानचे कौतुक होते. कारण सोव्हिएट संघराज्याला हिंदी महासागरात उतरण्याचा मार्ग हवा होता व असा जवळचा मार्ग पाकिस्तानातूनच होता. १९६२ साली क्यूबाच्या प्रश्नावरून अमेरिका व सोव्हिएट संघराज्य यांच्यात निकराचा पण शस्त्राचार विहीत संघर्ष झाला. त्यानंतर या दोन राष्ट्रातील शत्रुत्वात नरमाई आली. दोघांनी आपली प्रभाव क्षेत्रे वाटून घेतली. अशा वेळी सोव्हिएट संघराज्य व पाकिस्तान परस्परांच्या जवळ येऊ लागले. १९६५ सालच्या भारत-पाक युद्धाच्या वेळी सोव्हिएट संघराज्याने मध्यस्थी केली. त्यावेळी वाटाघाटींसाठी त्यांनी ताश्कंद हे शहर निवडावे ही सूचक गोष्ट होती. आपण आता मध्य व

दक्षिण आशियाई प्रदेशाकडे लक्ष देत आहोत, असे सांगण्याचा तो प्रयत्न होता. त्यानंतर सोव्हिएट संघराज्य पाकिस्तानला शस्त्रे पुरवू लागले. ७१ सालच्या बांगला देशाच्या युद्धात सोव्हिएट संघराज्याने आपल्याला अमेरिकेच्या विरोधात संरक्षण दिले खरे; पण त्याच बरोबर पश्चिम पाकिस्तानावर आपण केलेली मोहीम मागे घ्यायलाही भाग पाडले.

या झाल्या जुन्या गोष्टी. सोव्हिएट संघराज्याचे पतन झाले व शीतयुद्ध संपुष्टात आले. अमेरिकेच्या नजरेतून पाकिस्तानचे महत्त्व कमी होईल अशी राजकीय निरीक्षकांची अपेक्षा होती. पण याच वेळी अफगाणिस्तानात कट्टर धर्मवादी तालीबान पक्षाचे राज्य आले. त्या राजवटीला पायबंद घालण्यासाठी पाकिस्तानचा उपयोग अमेरिकेला झाला. सोव्हिएट संघराज्यातून सुटका झालेली राज्ये मुसलमान आहेत. तेथे मुसलमानातील कट्टरवादी विचारांचा फैलाव होऊ नये अशी (सोव्हिएट संघराज्याचे विघटन झाल्यानंतर उरलेल्या) रशियाची इच्छा आहे. त्यासाठी पाकिस्तानचा उपयोग होऊ शकेल. तसेच पूर्वी लिहिल्याप्रमाणे कराची बंदरातून अरबी समुद्रात उतरण्याचा मार्ग खुला राहावा, ही रशियाची अजून देखील इच्छा आहे. चीनला भारताच्या प्राबल्यावर उतारा म्हणून पाकिस्तानचे महत्त्व आहेच. खेरीज सियाचीन मार्गे पाकिस्तानातून कराचीला जाण्याचा रस्ता उपलब्ध झाला, तर चीनला तो हवाच आहे. ल्हासा आणि बैजिंग यांच्यातील दळणवळण रस्ता, लोहमार्ग व विमानमार्ग या तिन्ही वाटांनी फार वाढले आहे. तिबेट आणि चीनचा पश्चिम भाग यांना व्यापारासाठी कराचीचा उपयोग होईल. अशा रीतीने शीतयुद्धोत्तर परिस्थितीत देखील चीन, रशिया व अमेरिका या तिन्ही देशांचे हितसंबंध पाकिस्तानला जिवंत ठेवण्यात गुंतलेले आहेत.

काही निरीक्षक असे मत मांडतात की, अरबी समुद्राचा किनारा ही पाकिस्तानला मिळालेली व इतरांना लोभ वाटावयास लावणारी देणगी आहे. आज असे दिसते की, भूवेष्टित राष्ट्रांना काहीच महत्त्व उरलेले नाही. मंगोलिया, छाड हे देश विस्ताराने फार मोठे आहेत. पण त्यांना समुद्रकिनारा नसल्याने त्यांचे कोणासच महत्त्व वाटत नाही. जर काही उपायाने बलुचिस्तान व सिंध ही पाकिस्तानची राज्ये पाकिस्तानापासून वेगळी झाली तर उरलेले पाकिस्तान हे एक निष्प्रभ राष्ट्र होऊन राहील. काही हितसंबंधी देश बलुचिस्तान व सिंध येथील फुटीरतावादी गटांना मदत करत असतील, यात शंका नाही.

पाकिस्तानी राज्यकर्ते हा धोका ओळखून आहेत. पंजाबी रईस लोक व भारतातून पाकिस्तानात गेलेले श्रीमंत मुसलमान अधिकारी यांच्या युतीने गेली साठ वर्षे पाकिस्तानवर राज्य केले. मुशर्रफ हे भारतातूनच पाकिस्तानात गेलेले आहेत. त्यांनी नवाज शरीफ या पंजाबी पंतप्रधानाला हाकलून राज्य बळकावले व इथे वर सांगितलेली युती मोडली. आज देखील नवाज शरीफ यांच्याशी मिळते घेण्यापेक्षा बेनाझीर भुट्टो या सिंधी नेत्याशी करार करणे मुशर्रफ यांना जास्त सोईचे वाटते, याची पृष्ठभूमी याप्रमाणे आहे. आजच्या परिस्थितीत बलुचिस्तान व सिंध हे पाकिस्तानी राज्यकर्त्यांच्या लेखी पंजाबपेक्षा जास्त महत्त्वाचे आहेत.

आपण वर असे निरीक्षण नोंदवले आहेच की, दक्षिण आशियाई क्षेत्रात भारत हा सर्व दृष्टींनी प्रचंड सामर्थ्यशाली देश असूनही या क्षेत्रातील इतर देशांवर त्याचा जो प्रभाव असायला हवा तसा तो दिसत नाही. अमेरिका खंडात अमेरिकेची संयुक्त संस्थाने (सं.सं.) हा एक सर्वात प्रबळ देश आहे. संपूर्ण अमेरिका खंड हे या देशाच्या प्रभावाखाली आहे. क्यूबा वगळता इतर सर्व देश सं.सं. चे अंकित देश आहेत. दीडशे वर्षांपूर्वीच सं.सं.ने असे तत्त्व घोषित केले की, अमेरिका खंडाच्या बाहेरील कोणत्याही देशाला अमेरिका खंडात ढवळाढवळ करू दिली जाणार नाही. खरे तर सं.सं. हा देश तेव्हा फारसा सामर्थ्यशाली नव्हता. फ्रान्स, जर्मनी अशा देशांशी टक्कर घेण्याची त्याची ताकद नव्हती. पण इंग्लंडच्या पाठिंब्यावर व आरमारी सामर्थ्यावर विसंबून सं.सं.ने वरील तत्त्व अंमलात आणले. सोव्हिएट संघराज्याने क्यूबात अण्वस्त्रधारी क्षेपणास्त्रे ठेवलेली तेव्हा सं.सं.ने जागतिक युद्धाचा धोका पत्करूनही सोव्हिएट संघराज्याला आव्हान दिले. दक्षिण आशियाबाबत भारताने अशाच प्रकारचे धोरण स्वीकारायला हवे होते.

याच धोरणाचे दुसरे अंग म्हणजे आपण

आपल्या शेजारी राष्ट्रांचा इतका विश्वास संपादन केला पाहिजे की, पुढे मागे भारत त्यांना अंकित करून सोडील अशी भीती त्यांना वाटू नये. यासाठी फार मोठ्या राजकीय इच्छाशक्तीची आवश्यकता आहे. अशी इच्छाशक्ती भारतातील राजकीय नेत्यांनी दाखविली असती तर बांगला देशातून होणारी घूसखोरी थांबविता आली असती. हे उघड आहे की, बांगला देशातून आलेले घूसखोर हे आपल्याला एक गठ्ठा मते देतील अशा अपेक्षेने काही नेत्यांनी या घूसखोरीला उत्तेजन दिले. एका बाजूने ही घूसखोरी कडक उपाय योजून थांबवत असतानाच आपण आपल्या उद्योगपतींना बांगला देशात उद्योग काढण्याला सवलती व उत्तेजन देऊन तेथील रोजगारी वाढवू शकलो असतो. यात दोन्ही देशांचा फायदा होता. तीच गोष्ट पाकिस्तानची. इराण-पाकिस्तान-भारत यांना जोडणारी वायुनलिका बसविण्याची योजना भारत व पाकिस्तान यांचे संघटन आणखी वाढण्यास फार उपयोगी पडेल. या नलिकेच्या पाकिस्तानातून जाणाऱ्या भागाच्या रक्षणाची व देखभालीची जबाबदारी पाकिस्तानवर राहाणार आहे. पाकिस्तानने ही जबाबदारी निष्ठेने पार पाडल्यास फायदा केवळ भारतालाच होणार आहे, असे नाही. या वायूचा उपयोग करून बलुचिस्तान व सिंध इथे नवे कारखाने व वीजनिर्मितीकेंद्रे उभी राहातील आणि ही उद्रेकी राज्ये पाकिस्तानाचे प्रगतिशील विभाग बनतील.

सारांश, भारताने दक्षिण आशियातील प्रादेशिक महासत्ता बनणे याला केवळ लष्करी अर्थ नाही. या संपूर्ण विभागाकडे एकात्मिक प्रगतीच्या दृष्टीने पाहणे शक्य व गरजेचे आहे हे ध्यानात घेऊन तशा प्रगतीच्या कामी नेतृत्व स्वीकारून भारत महासत्ता बनू शकतो. भारतात उच्च व तांत्रिक शिक्षण देणाऱ्या, व्यवस्थापन-कायदा-विज्ञान-समाजशास्त्रे यांचे दर्जेदार शिक्षण देणाऱ्या नामांकित संस्था आहेत. या संस्थातून शिक्षण घेण्यात आपण या शेजारी राष्ट्रातील विद्यार्थ्यांना उत्तेजन दिले तर आपल्याला प्राप्ती होईलच पण हे विद्यार्थी परत जाऊन आपापल्या देशात नेतृत्वपदी जातील तेव्हा त्यांच्या मनात भारताविषयी सौहार्द सहजच नांदत असेल. अफगाणिस्तानचे नेते करझाई यांचे उदाहरण या दृष्टीने पाहण्यासारखे आहे. ते शिमल्याला विद्यार्थी म्हणून होते व याचा उल्लेख ते वारंवार करतात.

(६)

अखेर थोडक्यात परामर्श घ्यावयाचा तो हीच विचारधारा पुढे नेणाऱ्या काही मुद्द्यांचा.

माजी राष्ट्रपती डॉ. अब्दुल कलाम हे वारंवार सांगत असत की, इ.स. २०२० पर्यंत भारताने जागतिक महासत्तेचा दर्जा मिळविला पाहिजे. आपणापाशी तेवढी कुवत आहे; निश्चय मात्र हवा, असा त्यांच्या म्हणण्याचा आशय असे. हे त्यांचे म्हणणे अगदी खरे आहे. महाशक्ती होणे याचा अर्थ आपणापाशी इतर कोणत्याही राष्ट्राशी लढण्याला पुरेल इतके लष्करी सामर्थ्य असणे, हा आहेच. पण त्या रोकड्या सामर्थ्याप्रमाणेच आर्थिक व औद्योगिक संपन्नता, उत्तम शिक्षण व्यवस्था आणि विज्ञान व तंत्रज्ञान यात संशोधन करण्याची पात्रता, दळण-वळणाची साधने, ऊर्जेचा पुरवठा, आरोग्य व्यवस्था इत्यादी गैरलष्करी सामर्थ्यालाही महत्त्व आहे. याचेच उपांग म्हणजे महासत्तापद नुसते मिळून भागत नाही; ते टिकवून धरावे लागते. सोव्हिएट संघराज्याने महासत्तापद मिळविले होते, पण त्या राष्ट्राला ते पद तर राहोच पण स्वतःचे अस्तित्त्वही टिकविता आले नाही. याचे कारण हेच होते की, लष्करी सामर्थ्याची तरतूद करताना सोव्हिएट संघ-राज्याला गैरलष्करी सामर्थ्य जोडता आले नाही.

आज अशी स्थिती आहे की, भारतातील राज्यकर्त्या वर्गाने प्रबळ इच्छाशक्ती धारण केली तर महाशक्ती बनण्याची अपेक्षा शक्य कोटीत आलेली आहे. या इच्छाशक्तीने आर्थिक विकासाला जर अतिशय गती मिळू शकली तर त्या उत्साह व भरभराटीच्या स्रोतात धर्मवाद, जातिवाद, प्रांतवाद, भाषावाद इ. फुटीरतेची जन्मस्थाने विसरली जातील; त्यामुळे अतिरेकी व दहशतवादी यांना आळा बसेल. याच प्रवाहात आपण शेजारी राष्ट्रांना ओढून घेतले तर छुप्या आक्रमणाची संकटे विरून जातील. अशी धन्यतेची भावना थोडा काळ का होईना आपल्या देशात पसरते याचा अनुभव आपण बांगला देशासाठी झालेल्या यशस्वी युद्धानंतर तसेच आणीबाणी उठल्यानंतरच्या काही दिवसात घेतला आहे. ही ईप्सित प्राप्तीची (अॅचीव्हमेंट) धन्यता राष्ट्राला अधिक

मोठ्या गोष्टी करण्याला भाग पाडते.

भारताच्या वाढत्या सर्वांगीण सामर्थ्याची दखल जगातील प्रमुख राष्ट्रे घेऊ लागली आहेत. आपण अण्वस्त्र-नियंत्रण-करारावर सही केली नसतानाही आणि दहा वर्षांपूर्वी आपण अण्वस्त्राचे स्फोट करून एक प्रकारचे आव्हान दिले असूनही अमेरिका आपणाशी अणुकरार करू इच्छिते ही लक्षणीय गोष्ट आहे. इंग्लंड, अमेरिका, रशिया, ऑस्ट्रेलिया इत्यादी देशांच्या आरमारांबरोबर आपल्या नौदलाच्या कवायती व सराव होतात, हे आपल्या वाढत्या लष्करी सामर्थ्याचे गमक आहे.

अखेरीस मुद्दा येतो तो सुरक्षा समितीच्या (सिक्युरिटी कौन्सिल) कायम सदस्यत्वाचा. मुळात अमेरिका-रशियादी मूळ सदस्यांनी सुरक्षासमितीच्या विस्ताराला मान्यता दिली हीच इतर देशांच्या दृष्टीने एक ईप्सितप्राप्ती (अॅचीव्हमेंट) आहे. मूळ पाच शक्तिशाली राष्ट्रांपेक्षा निराळ्या अशा शक्ती जगाच्या रंगमंचावर वावरत आहेत याची दखल मूळ सदस्यांना घ्यावी लागली आहे. विस्तारित सुरक्षा समितीत आपल्याला नकाराधिकारासहित कायमचे स्थान मिळावे असा आग्रह भारताने धरावा यातही काही वावगे नाही. ही फलप्राप्ती होण्यासाठी आपली चाणक्यशक्ती (डिप्लोमसी) आपण कौशल्याने वापरली पाहिजे.

▣▣▣

**टीप :** ले.ज. दत्तात्रय शेकटकर (निवृत्त) यांच्या हाताला दुखापत झाली असल्याने ते स्वतः हा लेख लिहू शकत नव्हते. दि. १० सप्टेंबर रोजी त्यांनी मला दीर्घ मुलाखत दिली. त्यावेळी केलेल्या टिपणांच्या आधारे मी हा लेख लिहिला आहे. ले. ज. दत्तात्रय शेकटकर (निवृत्त) यांचा मी फार फार आभारी आहे.

– श्री. मा. भावे.

▣▣▣


प्राज्ञपाठशाळा मंडळाचे प्रकाशन

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी**
**स्मृतिव्याख्यान, २००१**

**नागरी समाज, राज्यसंस्था**
**आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन**

**द. ना. धनागरे**

नागरी समाजाचे स्वरूप, भारतासारख्या आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेच्या विविध टप्प्यांवर असलेल्या व्यामिश्र समाजांमध्ये 'नागरी समाजा'ची संकल्पना स्वीकारताना निर्माण होणाऱ्या प्रश्नांची नेटकी मांडणी येथे एका ज्येष्ठ समाजशास्त्रज्ञाने केली आहे.

मराठीत दुर्लक्षित राहिलेल्या या विषयावरील बहुधा एकमेव सुबोध विवेचन.

पृष्ठे ५४
किंमत रू. ४०/-

*संपर्कासाठी पत्ता :* **चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**


२४/१०

# भारत - नेपाळ संबंध आणि उत्तर - पूर्व सीमा सुरक्षा

विश्वास दांडेकर

India is like a fortress, with the vast moat of the sea on two of her faces and with mountains for her walls on the remainder; but beyond these walls, which are sometimes of by no means insuperable height, and admit of being easily penetrated, extends a glacis of varying breadth and dimension. We do not want to occupy it, but we also cannot afford to see it occupied by our foes. We are quite content to let it remain in the hands of our allies and friends, but if rivals creep upto it and lodge themselves right under our walls, we are compelled to intervene because a danger would thereby grow up which might one day menace our security............ He would be a short - sighted commander who merely manned his ramparts in India and did not look beyond.

- Lord Curzon.

जवळपास १०० वर्षांपूर्वी निराळ्या संदर्भात निघालेले हे लॉर्ड कर्झन यांचे उद्‌गार आजही विचार करायला लावणारे आहेत. स्वातंत्र्य आंदोलनातल्या भूमिकांमुळे लॉर्ड कर्झन हे भारतात लोकप्रिय नाव नाही, द्वेषाचेच आहे. मात्र आता स्वातंत्र्य मिळून साठ वर्षे उलटली आहेत. स्वतःच्या हितसंबंधाच्या रक्षणासाठी तेव्हाच्या ब्रिटिश भारताच्या संरक्षणाच्या संदर्भात (पार्श्वभूमी : अफगाणिस्तान-रशिया पुढे येणे) काढलेले चित्र भूव्यूहात्मक (Geo-Strategic) विचारात आजही मननीय आहेत. आंतरराष्ट्रीय परिस्थिती बदलली, भारतीय उपखंडाचा नकाशा बदलला, मध्य आशिया बदलला पण भूगोल तोच आहे. संरक्षण या क्षेत्रात मूलतत्त्वे सहसा बदलत नाहीत.

कर्झन यांनी मांडलेले चित्र हिमालयसीमा संदर्भात आजही खरे असले तरी तपशिलात फरक पडला आहे. शिवाय संपूर्ण उत्तर सीमा हा या लेखात मांडण्याचा विषय नाही. पश्चिमेकडची अफगाण सीमा (तथाकथित 'आझाद काश्मीर' घेऊन) आता पाकिस्तानची डोकेदुखी आहे. लडाख (अक्साई- चीन) व अरुणाचल प्रदेश (नेफा) हे चीनबरोबर उगाचच भिजत पडलेले घोंगडे आहे. यात नजिकच्या ५।१०।१५ वर्षांत फारसा फरक पडणार नसला तरी अक्साई-चीन व अरुणाचल प्रदेश यावर पुन्हा सीमा युद्ध भडकण्याची शक्यता नाही. सध्या भारत - चीन यांनी आपापल्या ताब्यांत ठेवलेल्या भूभागांवर किरकोळ फेरफार करून हा सीमातंटा सोडवला जाईल. कधी? हा निराळा विषय. म्यानमार (ब्रह्मदेश) बांगलादेश (पूर्व बंगाल) व काश्मीर सोडता (सोबत सीरक्रीक) पाकिस्तानसोबत सीमाविवाद नाही. सिक्किम भारतात विलीन झाला आहे, भूतानसंबंधी फार मोठे प्रश्न नाहीत. या चित्रात उरतो 'नेपाळ.' नेपाळबरोबर भारताचा कुठलाही सीमाविवाद नाही पण नेपाळ भारतापुढे नेहमीच (स्वातंत्र्यापासून) एक प्रश्नचिन्ह उभे आहे. हे प्रश्नचिन्ह आज आकाराने खूप मोठे व गुंतागुंतीचे झाले आहे.

जगातील एकमेव हिंदु राष्ट्र म्हणून नेपाळचा गौरव करणे निराळे व वस्तुस्थितीवर आधारित आंतरराष्ट्रीय - अंतर्गत राजकारण निराळे. यात अंतर्गत परिस्थिती व आंतरराष्ट्रीय राजकारण यांचे धागेदोरे एकत्र झाले म्हणजे परिस्थिती जे गंभीर वळण घेते तिथे आज नेपाळ उभा आहे, त्यामुळे भारताच्या संरक्षणाच्या चित्रात ही जागा नाजूक बनली आहे.

ही परिस्थिती उभी राहिली याला कारण चीन आहे. गुरखा युद्धात (१८/०४/१६) नेपाळचा पराभव ब्रिटिशांनी केला त्यावेळी नेपाळ खालसा करून ब्रिटिश प्रदेशात (म्हणजे भारतात) जोडणे ब्रिटिशांना शक्य होते. असे केल्यास चीन नाराज होईल म्हणून ते ब्रिटिशांनी टाळले. मात्र नेपाळचे सत्ताधारी ब्रिटिश सत्तेच्या अंकित

अनुक्रमणिका

राहतील याची काळजी घेतली. सिमला वगैरे नेपाळचा जिंकलेला भाग मात्र भारतात विलीन करण्यात आला. अफगाण-काश्मीर सीमा ते ब्रह्मदेशची सीमा असा हिमालयाचा जो लांबलचक पट्टा आहे तिथे १५ ऑगस्ट १९४७ साली अस्तित्वात असलेला राजकीय पट (पोलिटिकल मॅप) हा ब्रिटन-चीन व रशिया यांच्या साम्राज्य वाढवण्याच्या व टिकवण्याच्या स्पर्धेतून निर्माण होत गेला आहे. तो सर्व वृत्तांत आजही महत्त्वाचा असला तरी या लेखाचा तो विषय नाही. त्या उलाढालीत नेपाळ हे एक प्यादे चीनी प्रभुत्त्वाखालून बाहेर काढत स्वतःच्या प्रभुत्त्वाखाली आणण्यात आणि तिबेटमध्ये वर्चस्व निर्माण करण्यात ब्रिटन यशस्वी झाले. या खेळातली काही तत्त्वे मात्र नीट ध्यानी घेणे आवश्यक आहे. १) ब्रिटनला मुख्य भीती रशियाच्या दक्षिणेकडे हातपाय पसरण्याची होती. २) १७९२ इतक्या पूर्वीच्या काळात तिबेट जिंकण्याचा प्रयत्न नेपाळने केला होता त्यावेळी चीनी सैन्याने नेपाळचा पराभव करत जवळपास काठमांडूपर्यंत धडक मारली होती. हिमालय सीमेवर चीनी भूसैन्यासोबत मोठी व दीर्घ लढाई खेळणे ब्रिटिशांना कधीही शक्य नव्हते. तेव्हा रशियाच्या साम्राज्याचे दक्षिण टोक व भारत यामध्ये चीनला वाव देणे, इंग्रजीत (Buffer) म्हणतात तसा चीनचा वापर करणे अशी सर्वसाधारण नीती ब्रिटनची राहिली. ३) यामुळे सिंकियांग (आजचा झिगियांग) तिबेट इथे चीनी वर्चस्व फार वाढू द्यायचे नाही ही काळजी ब्रिटन घेत असला तरी भीती रशियाची होती, चीनची नव्हती. याचे मुख्य कारण ब्रिटनचे नाविक सामर्थ्य. चीनने भारतात शिरण्याचा मनसुबा केला तर आपल्या नौदलाच्या साहाय्याने चीनला शह देणे ब्रिटनला सहज शक्य होते, (जपान मित्रराष्ट्र होते, रशियाचाही चीनबरोबर सीमातंटा होता) याची जाणीव चीनलाही होती. सत्तेचा समतोल (Balance of Power) साधला गेला. हे सर्व चित्र दुसऱ्या महायुद्धामुळे संपूर्ण बदलले.

दुसऱ्या महायुद्धाचा एक महत्त्वाचा परिणाम म्हणजे भारत स्वतंत्र होणे. सोबत जपानचा पराभव झाल्याने जपानच्या ताब्यातील चीनी भूभाग चीनला परत मिळाला. चीनने तिबेट व्यापला, झिगियांग - तिबेट यांना जोडण्यासाठी बारमाही रस्ता बांधला. आता भारताची उत्तर सीमा सुरक्षित ठेवण्यासाठी जपान- रशिया व ब्रिटिश नौदल चित्रात नव्हते. इथे चीन - भारत या चित्रात इतर सीमाप्रदेशाबरोबर नेपाळचे महत्त्व वाढले.

आकाराने प्रचंड मोठ्या आणि त्या आधारावर तुलनेने बलवान असलेल्या दोन राष्ट्रांच्या मधे असलेली सागरी सीमा नसलेली राष्ट्रे दबावाखाली असतात. आपला जीव वाचवण्यासाठी दोन्ही राष्ट्रांना एका बाजूने 'सुसरबाई तुझी पाठ मऊ' करत राहतात व दुसऱ्या बाजूने आपला झुकाव कधी इकडे तर कधी तिकडे असा दर्शवत आपलाही दबाव दाखवत राहतात. रशिया-जर्मनी यांचे मधला पोलंड, ब्रिटिश, भारत व रशिया यांचे मधला अफगाणिस्तान ही उदाहरणे आठवावीत. या सुरवातीच्या काळात नेपाळच्या राजाला भारतात आश्रय घेणे अंतर्गत कटकटींमुळे भाग पडले. नेपाळ भारतात सामील करून घेण्याचीही संधी तेव्हा आली होती. स्वातंत्र्यानंतर उद्‌भवलेल्या अनेक प्रश्नांचे मोहोळ वा चीनची संभाव्य भूमिका अशा गोष्टींमुळे भारताने संधी सोडून दिली असावी. त्यावेळचे कागदपत्र अजूनही गुप्त आहेत.

नेपाळमध्ये भारताला तसे खूप अनुकूल वातावरण होते, आहेही. भारतीय रुपया नेपाळमध्ये स्वीकारला जातो, दोन्ही देशांचे नागरिक परस्परांच्या देशात ये-जा करतात, नेपाळमध्ये धार्मिक - सांस्कृतिक वातावरण भारतानुकूल आहे, नेपाळ - भारत यामध्ये हिमालयासारखी उत्तुंग पर्वतराजी नाही, भारतीय सैन्यात नेपाळींच्या पलटणी आहेत. नागरी प्रदेशात रक्षक म्हणून नेपाळी माणूस सहज स्वीकारला जातो, परस्पर व्यापार आहे. नेपाळला बंदरे भारतातीलच वापरावी लागतात, (ही सेवा चीन पुरवू शकत नाही) अशी ही मालिका खूप वाढवता येईल. प्रश्न असा : मग नेपाळ भारताच्या संरक्षण व्यवस्थेत प्रश्न म्हणून का उभा राहतो ?

याचे एका शब्दात उत्तर द्यायचे तर 'चीन'. अर्थात हे उत्तर अपुरे आहे. नेपाळ व भारत यांची अंतर्गत परिस्थिती जर सुविहित असती तर चीनची काळजी करण्याचे काहीही कारण नव्हते. १९६२ चा भारत आज नाही याची जाणीव चीनलाही आहे. शिवाय आता स्पर्धेची क्षेत्रेही बदलली आहेत. मात्र या बदलत्या परिस्थितीची कितपत दखल भारताच्या परराष्ट्र धोरणात घेतली जात

आहे हा यक्ष प्रश्न आहे. शिवाय धोरण ठरल्यावर अमंलबजावणीच्या क्षेत्रातला ढिलेपणा भारताच्या वाटचालीत नेहमीच पायाला बांधलेल्या साखळदंडाप्रमाणे अडसर ठरला आहे.

भारताचा नेपाळमध्ये जाणवणारा प्रभाव कमी करण्याचा प्रयत्न चीन करणार यात आश्चर्य नाही. प्रत्येक राष्ट्र स्वतःचे हितसंबंध जपण्याचा, वाढवण्याचा प्रयत्न करणारच, प्रश्न भारताने काय करावे असा आहे.

चीनमध्ये कम्युनिस्ट क्रांती दीर्घ लढ्यानंतर यशस्वी झाली. दुसरे महायुद्ध नुकतेच संपले होते. आता तिबेट व्यापला जाणार हे स्पष्ट होते. तिबेटमध्ये चीन वावरू लागताच त्याने रस्तेबांधणी हा कार्यक्रम जोमाने अमलात आणला आणि बघता बघता ल्हासा ते काठमांडू असा रस्ता पूर्ण होऊन वापर सुरू झाला. आता तिबेटमधे ल्हासापर्यंत चीनने रेल्वेमार्ग आणला आहे. पश्चिमेकडे उझबेगीस्तानच्या सीमेपर्यंत तर दक्षिणेकडे काठमांडूपर्यंत ही रेल्वे चीन आणत आहे. यातून चीन नेपाळ संबंध खूप वाढण्यास वाव मिळेल. नेपाळला बंदर नाही. भारत - नेपाळ व्यापार कराराची मुदत संपल्यावर (प्रधानमंत्री राजीव गांधी) भारतीय बंदरांमधून नेपाळकडे जाणारी वाहतूक संपूर्णपणे थांबवण्यात आली होती. त्यावेळी नेपाळमधे अनेक वस्तूंची चणचण निर्माण झाली. ही जखम नेपाळ मनात वागवणार. भारताच्या तुलनेत लहान असलेल्या नेपाळशी संबंध जुळते ठेवण्यासाठी भारताने झुकते माप ठेवायला हवे, पलीकडे चीन हातपाय पसरण्याची वाट पाहात आहे हे भान अनेकदा विसरले गेले आहे.

रस्ते - रेल्वे बांधणी हा स्वतंत्र विषय सीमा-रक्षणाच्या क्षेत्रात येतो. ब्रिटनने जाणीवपूर्वक सीमा रस्ते - रेल्वे यांनी जोडल्या नाहीत. मात्र बदललेल्या परिस्थितीत धोरण बदलायला हवे ही जाग भारताला यायला फार काळ जावा लागला. फक्त रस्ते - रेल्वे या क्षेत्रात आपण नेपाळशी जवळीक साधली असती तरी चीनचा प्रभाव मर्यादित राहिला असता.

राजघराणे - राणाशाही - संरजामी पद्धत - कारखानदारीचा अभाव वगैरे नेपाळमधल्या अंर्तगत तणातणीच्या तपशिलात जाण्याचे हे स्थळ नाही. इतके नोंदवणे पुरेसे असावे की या अंर्तगत परिस्थितीचा फायदा उठवत उभ्या राहत असलेल्या 'माओ' वादी चळवळीला चीनने ताकद दिली. शांतपणे तयारी करत माओवाद्यांनी उठाव केला. आज माओवाद्यांना गणितात घेतल्याशिवाय नेपाळमध्ये महत्त्वाचे कांही घडणे - घडवणे अशक्य आहे. याचा थेट संबंध भारताच्या सुरक्षेबाबत आहे.

साठीच्या दशकाच्या उत्तरार्धात 'नक्सलबाडी' येथून कनू सन्याल व चाऊ मुजुमदार यांनी जो उठाव केला त्यामागे माओप्रणित कडव्या मार्क्सवादाचा प्रभाव होता. काही काळ प्रभावी, मग कमी झालेला, पुन्हा डोके वर काढणारा असा हा प्रवास. त्याहीआधी निजामाच्या हैदराबाद संस्थानात सरंजाम - जमीनदारी विरोधात सशस्त्र चळवळ सुरू होती. हळूहळू ही नक्सलवादी चळवळ पसरत गेली. आजच्या भारतात १७२ जिल्हे कमी अधिक प्रमाणांत नक्सलवादी चळवळीच्या प्रभावाखाली आहेत. याचा भूगोल जास्त धोकादायक आहे. भारताच्या नकाशावर पाहिले तर नेपाळला सीमा भिडलेल्या बिहारपासून सलग दक्षिणेकडे झारखंड-ओरिसा-छत्तीसगढ, मध्यप्रदेश-महाराष्ट्र, व आंध्रप्रदेश असा हा पट्टा पसरलेला आहे. आंध्रच्या खाली तामिळनाडू आहे. तिथे नक्सलवादी नाहीत पण अेलटीटीईचे खूप विस्तृत व प्रभावी जाळे आहे. नक्सलवादी व तामिल ईलम या दोन संघटनांनी आपसात संबंध जोडले असल्याचे पुरावे सुरक्षा क्षेत्रात ज्ञात आहेत. याचा अर्थ उत्तरेला तिबेट सीमा ते दक्षिणेला श्रीलंकेच्या जवळ अशा संपूर्ण भारताला दोन भागात विभागणारा हा पट्टा तयार झाला आहे. ही मंडळी सशस्त्र आहेत, दहशतीच्या आधारावर आपला शब्द खरा करण्याची क्षमता राखून आहेत. यातला एक चटकन नजरेत न येणारा पण महत्त्वाचा भाग म्हणजे भारताचे फार मोठे खनीज साठे या पट्ट्यात आहेत. (लोह, कोळसा, अभ्रक इत्यादी.) पुढे मागे हे खनीज काढणे, वाहतूक, त्यावर आधारित कारखानदारी हे चक्र थांबवण्याचा प्रयत्न नक्सलवादी चळवळ करू शकते. यामुळे असलेली कारखानदारी धोक्यात येणे, नव्याने गुंतवणूक थंडावणे अशा प्रकारे भारताच्या आर्थिक प्रगतीला खीळ घालण्याचा प्रयत्न केला जाऊ शकतो. अराजक निर्माण करून राज्ययंत्र ताब्यात घेणे या व्यूहरचनेवर नक्सलवादी काम

करतात हे लक्षात घेता धोक्याचे गंभीर स्वरूप स्पष्ट व्हावे.

नेपाळमधील माओवादी व भारतातले नक्सलवादी यांची विचारसारणी एकाच मार्गावरून जाणारी आहे व त्या विचारांचा उगम - स्फूर्तिस्थान चीन आहे हे ध्यानी घेतले म्हणजे काळजीचा स्तर वाढतो.

या 'युती' च्या धोक्याला आणखी काही पदर आहेत.

१) अलिकडेच संयुक्तराष्ट्र संघटनेने जाहीर केलेल्या आकडेवारीनुसार अफगाणिस्तानात अफूची लागवड प्रचंड वाढून यंदा उत्पादन ८००० टनांच्या वर गेले आहे. या अफूपासून 'हेरॉइन' या मादक द्रव्याचे उत्पादन अफगाणीस्तान - पाकिस्तान इथे केले जाते. या ८००० टनांपैकी ८० टक्के म्हणजे जवळपास ६५०० टन उत्पादन पाक - अफगाण सीमाभागात होते. 'हेरॉईन' तयार करण्याचे तंत्र व मंत्र फार किचकट, खर्चिक व मोठी जागा व्यापणारे नाही. एका रुग्णवाहिकेच्या आकाराच्या गाडीत हा कारखाना उभारता येतो, गाडी इकडून तिकडे ये-जा करू शकते. पाकिस्तानची आयएसआय ही गुप्तचरसंस्था, वरिष्ठ सेनाधिकारी यांना या अफू - हेरॉईनच्या चोरट्या व्यापारातून प्रचंड पैसा मिळतो हे गुपित नाही. या व्यापारात आता तालिबान उतरले आहे. दहशतवादी संघटनांना या चोरट्या व्यापार माध्यमातून पैसा - शस्त्रे पुरवण्यात येतात. या व्यापारासाठी नेपाळमधली अस्थिर परिस्थिती म्हणजे प्रचंड मोठी संधी आहे. नेपाळ हे चोरट्या व्यापाराचे केंद्र म्हणून पूर्वीपासून ज्ञात आहे. ही साखळी वापरून माओवादी - नक्सलवादी शक्तींना मदत मादक पदार्थांच्या चोरट्या व्यापारातून करणे आयएसआयला शक्य आहे. भारताचा द्वेष हा पाया असलेल्या त्या संस्थेला ही संधी साधण्याची इच्छा होणे सहज शक्य आहे.

२) नक्सल चळवळीचा पट्टा पाहिला म्हणजे खूप मोठा समुद्रकिनारा त्यांना हाताशी आहे हे ध्यानी येते. (ओरिसा, आंध्र.) बंगालच्या उपसागरात पूर्वेला ब्रह्मदेश म्हणजे म्यानमार प्रचंड चिनी प्रभावाखाली आहे. त्यांच्या समुद्रकिनाऱ्यावर चीन नाविक तळ उभारत आहे. नेपाळी माओवाद्यांशी हातमिळवणी झालेल्या नक्सल चळवळीला म्यानमारमधून शस्त्र-रसद पुरवठयाची सोय करणे चीनला शक्य आहे.

३) भारतात नक्सल चळवळीला उत्तर देण्यासाठी संबंधित राज्ये व केंद्र शासन यांनी काही सुनियोजित योजना आखल्याचा पुरावा नाही. कायदा - सुव्यवस्था हा राज्यांच्या अखत्यारीतला विषय. मात्र हा देशाच्या सुरक्षेचा प्रश्न असल्याने केंद्राचे गृहखाते यात महत्त्वाचे ठरते. या सर्वांचा आपसात समन्वय नीट जोपासलेला नाही. आंध्रमध्ये नवे शासन आसनस्थ झाल्याबरोबर नक्सलवाद्यांशी बोलणी करणार असल्याचे जाहीर झाले. दहशतवादी संघटना जेव्हा अडचणीत असतात तेव्हां तात्पुरता तह करायला लगेच तयार होतात कारण वाटाघाटी एकीकडे करत असताना दुसरीकडे तयारी वाढवत अडचणींमधून बाहेर पडता येते. काश्मीर, श्रीलंका इथे याचा पुरेसा अनुभव आलेला असून आंध्र प्रदेशने हा मार्ग चोखाळला. परिणाम ज्ञात आहेत.

४) नेपाळमधील चीनच्या पाठिंब्यावर उभे असणारे माओवादी व भारतातले नक्सलवादी यांची एकजूट तोडण्याचा एक मार्ग या सर्व पट्ट्यातले दळणवळण - संदेश - संपर्क व्यवस्था सुधारणे. गाजावाजा करून सुरू केलेला राष्ट्रीय रस्ते सुधारणा कार्यक्रम पैसे उपलब्ध असूनही मंद गतीने चालला आहे. याची गती वाढवायला हवी.

५) माओवादी - नक्सलवादी यांना जनतेतून पाठिंबा मिळतो तो केवळ दहशतीमुळे नव्हे. आर्थिक दुरावस्था हे एक आत्यंतिक महत्त्वाचे कारण आहे. आवश्यक त्या आर्थिक उपाययोजना व सुरक्षा पथकांचा दबाव यांनी एकत्रित वाटचाल केल्यास परिस्थितीत बदल घडवता येईल. मात्र याची तातडी संबंधित राज्ये - केंद्र दाखवत आहे हे जाणवत नाही.

शेवटी प्रश्नचिन्ह उभे आहे त्यात नेपाळ हे प्यादे आहे. भावी काळाची पाऊले न ओळखल्यामुळे नेपाळमध्ये चीनला इतका प्रभाव वाढवता आला. भारतीय लष्करात उत्तम प्रशिक्षण मिळालेले गुरखा सैनिक निवृत्तीनंतर नेपाळमध्ये परततात. यांचेतून माओवाद्यांना स्वयंसेवक मिळतात. प्रश्न चीनचा विस्तारवाद, प्रभाव क्षेत्र वाढवण्याचा रेटा हा आहे. भारताने नुकताच आणखी चार राष्ट्रांसोबत नाविक युद्धाचा सराव केला. या सरावाचे कारण काय, काय साधायचा तुमचा प्रयत्न आहे असा

उद्धट सवाल चीनने भारताला केला. याला उत्तर तुमचा काय संबंध असा उलट प्रश्न विचारणे असे होते. अरे ला कारे ही भाषा चीनला समजते. नेफावरचा दावा सोडून अक्साई चीनचा एक भाग (तिबेट झिंगियांग जोडरस्ता) चीनचा म्हणून मान्यता मिळवत सीमाविवाद संपवण्याच्या मार्गावर चीन आहे असे चित्र मध्यंतरी तयार झाले होते. सिक्किमचे भारतात विलिनीकरण याच दिशेकडचे पाऊल होते. अलिकडे चीन निराळी भाषा बोलू लागला आहे. यामुळे अस्वस्थ होण्याचे वा घाबरून जाण्याचे कारण नाही.

१९४७ नंतर भारत - चीन सीमा विवाद संपवण्यासाठीचा दूरदर्शीपणा भारत दाखवू शकला नाही. त्याच प्रकारची घोडचूक नेपाळच्या बाबतीत होता कामा नये. मध्य आशियात चीनचा प्रभाव वाढवण्याचा प्रयत्न चीन करत आहे, तिबेट - झिंगियांग इथे चिनी मुख्य भूमीतून स्थलांतर घडवून आणले जात आहे. म्यानमार मध्ये वर्चस्व व पाकिस्तानच्या ग्वादार बंदरात नाविकतळ उभारून अरबी समुद्रात मजबूत हजेरी या मार्गावर 'नेपाळ' चा एक प्यादे म्हणून चीन उपयोग करणार. भारताच्या अंर्तगत परिस्थितीशी हा प्रश्न जोडला गेला आहे. या विशाल पटावर आपल्या हालचाली नीट व सावध हव्यात.



---


**प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई**

दुसरी संवर्धित आवृत्ती

**हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन**

**मे.पुं.रेगे**

भारतातील नवसमाजउभारणीचे ध्येय साधण्यासाठी आधारभूत होऊ शकणाऱ्या भारतीय नैतिक-आध्यात्मिक परंपरेचे सुबोध दिग्दर्शन करणाऱ्या ग्रंथाच्या या संवर्धित आवृत्तीत प्रा.शि.स.अंतरकर आणि प्रा.स.ह.देशपांडे यांचे परीक्षण लेख, प्रा.मे.पुं.रेगे यांनी अंतरकर यांच्या परीक्षणाचा घेतलेला परामर्श आणि प्रा.स.ह.देशपांडे यांच्या परीक्षणाचा प्रा. रेगे यांच्या विचारव्यूहाच्या संदर्भात श्री. वसंतराव पळशीकर यांनी केलेला ऊहापोह या नवीन मजकुराचा समावेश आहे. सद्य:स्थितीत अत्यंत प्रस्तुत असलेला हा ग्रंथ आपल्या संग्रही हवाच.

**पृष्ठे २१५ किंमत रू. १६०/-**

*संपर्क :* **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**

# भारताची ऊर्जेची गरज : नागरी व लष्करी

अजेय लेले

येत्या काही वर्षांत भारताचा आर्थिक विकासाचा दर ९ ते १० टक्क्यांपर्यंत चढेल व तिथे स्थिर राहील, असा अंदाज आहे. अशा तऱ्हेचा विकास-दर गाठायचा तर भारताला ऊर्जेचा पुरेसा पुरवठा होत राहील, याची काळजी घ्यावी लागेल. सध्या आपला विकास-दर ८ टक्के आहे. हा विकास-दर राखायचे म्हटले तरी येती तीस, चाळीस वर्षे आपल्याला उपलब्ध असणाऱ्या ऊर्जेत दरवर्षी ६ टक्के वाढ घडवून आणावी लागेल. सध्या आपण आपल्या घाऊक उत्पादनाच्या २.५ टक्के पेक्षा थोडा कमीच इतका खर्च लष्करावर करतो व नजिकच्या भविष्यकाळातही हा खर्च २.५ टक्के ते ३ टक्के यांच्या दरम्यान होत राहील, असे दिसते. लष्कराचे आधुनिकीकरण ही सतत चालणारी व गतिशाली (डायनॅमिक) प्रक्रिया आहे. शत्रूवर अस्त्रे सोडण्याची आपली यंत्रणा आपल्याला सतत सुधारत न्यावी लागते किंवा नवीन यंत्रणा उभी करावी लागते. अशा तऱ्हेने आर्थिक विकास व लष्करी सामर्थ्य टिकवून धरणे या दोन्हीसाठी ऊर्जेची मागणी वाढतच असते.

ऊर्जा स्रोतांवर प्रभुत्त्व मिळविण्यासाठी मोठ्या राष्ट्रांनी परस्पर-सहाय्यक-संघ फार पूर्वीपासून तयार केले आहेत. या ऊर्जेसाठी चाललेल्या स्पर्धेत भारत आता कुठे उतरत आहे. त्यामुळेच ऊर्जा मिळविताना भारताला अनेक अडथळ्यांना तोंड द्यावे लागते आहे. १९९ दशक उजाडेपर्यंत ऊर्जेचा हमखास पुरवठा होत राहील याची व्यवस्था करणारे कोणतेच धोरण भारताने आखले नव्हते. ऊर्जेचा विचार करणाऱ्या संसदीय समितीने १९९७ साली म्हटले होते की, "ऊर्जेच्या क्षेत्राबाबत बोलायचे तर आपणासमोर महत्त्वाच्या समस्या आहेत. आपल्यापाशी ऊर्जेच्या उपलब्धीविषयी समग्र आणि दीर्घकालीन अशी योजना नाही. ऊर्जेचा पुरवठा आणि वापर या दोन्हीत फार नासधूस होते. निरनिराळ्या प्रकारच्या ऊर्जांची एक खिचडीच बनली आहे व हे मिश्रण टिकाऊ आहे असे वाटत नाही. ऊर्जा-स्रोतांच्या विकासासाठी जे भांडवल लागते ते आपल्यापाशी नाही. ऊर्जेची किंमत ठरविण्याचे कोणतेच विवेकपूर्ण धोरण नाही आणि ऊर्जेसाठी परिसराची जी काळजी घ्यायला हवी ती घेतली जात नाही....."

थोडक्यात म्हणजे ऊर्जा-क्षेत्राच्या विकासा-साठीची दृष्टी आपल्याकडे नव्हती व ऊर्जेच्या विकासाला उपयोगी अशी धोरणेही आपण ठरविली नव्हती. परंतु, गेल्या काही वर्षात भारतातील राजकीय नेतृत्व ऊर्जेच्या प्रश्नाकडे अधिक गांभीर्याने लक्ष देऊ लागले आहे. जुलै २००५ मध्ये पंतप्रधान मनमोहनसिंग यांच्या अध्यक्षतेखाली संबंधित खात्यांच्या मंत्र्यांची एक समिती 'ऊर्जाविषयक सुसूत्रता समिती' (एनर्जी को-ऑर्डिनेशन कमिटी) या नावाने स्थापण्यात आली. तिने भारताची ऊर्जेची गरज, ती भागविण्यासाठी शक्य असणारी धोरणे, देशाला ऊर्जेचा पुरवठा हमखास व्हावा याबद्दल घ्यायची काळजी यांचा साकल्याने विचार करावयाचा होता.

ऊर्जेविषयीच्या ज्या समस्या आहेत त्यांच्या बाबतीत आपण आता बहुआयामी डावपेचांची आखणी करीत आहोत. पहिली गोष्ट अशी की, ऊर्जेच्या क्षेत्रात आपण स्पर्धेला मोकळीक दिली आहे; त्यामुळे या क्षेत्रातील व्यवहारात पारदर्शकता आली आहे. दुसरे म्हणजे पारंपरिक ऊर्जेच्या स्रोतांबरोबरच नवीन ऊर्जास्रोतांच्या विकासावरही सरकार तेवढाच भर देत आहे. तिसरे, ज्या क्षेत्रात ऊर्जेचा भरमसाट वापर तो, उदा. वाहतूक, अशा क्षेत्रात इंधनाचा अधिक काटकसरीने वापर करणारे तंत्रज्ञान शोधून काढण्यासाठी खासगी उद्योगांना प्रोत्साहन देण्यात येत आहे. यात खेदाची गोष्ट अशी आहे की, ऊर्जेचे परिचित प्रकार पुरेसे पुरवठ्याचे नाहीत आणि अपारंपरिक ऊर्जास्रोतांविषयींची तसेच परराष्ट्रातून ऊर्जेचा पुरवठा कितीसा उपलब्ध आहे याची माहिती असूनही आपली मदार मात्र हायड्रोकार्बन स्वरूपाच्या

ऊर्जेवरच राहिली आहे.

हायड्रोकार्बन स्वरूपाच्या ऊर्जेविषयी वर जरी काहीसे हेटाळणीने लिहिले असले तरी हे मान्य करायलाच हवे की, भविष्यकाळात नैसर्गिक वायू हा ऊर्जेचा महत्त्वाचा स्रोत राहणार आहे. जगातील तेलाचे उत्पादन २०१० सालापर्यंत वाढत राहील व नंतर तिथेच खुंटून राहील, असे दिसते. पण नैसर्गिक वायूचे उत्पादन व वापर ही दोन्ही त्यानंतर काही दशके तरी वाढतच राहतील. नैसर्गिक वायूच्या वापरातून परिसराला पोचणारा धोका कोळसा व पेट्रोल यांच्या वापरामुळे निर्माण होणाऱ्या धोक्यापेक्षा फारच कमी असतो. क्योटो कराराने अलिकडेच निरनिराळ्या राष्ट्रांना त्यांनी पर्यावरणाचा धोका किती प्रमाणात कमी करावा, याची लक्ष्ये ठरवून दिली आहेत. ती लक्षात घेतली तर आता नैसर्गिक वायूच्या वापराला तेजी येणार असा अंदाज बांधता येतो.

भारतातील तेलाचे उत्पादन तीन कोटी तीस लाख टनांच्या आसपास आहे. आपल्याकडील तेल-साठे भविष्य काळातील आपली गरज लक्षात घेता अगदीच तुटपुंजे आहेत. अलिकडे नैसर्गिक वायूचे नवे साठे सापडले असले तरी आपली गरज भागवायला ते पुरेसे नाहीत. आपल्याकडे कोळशाचे साठे भरपूर आहेत. पण कोळशाचा दर्जा चांगला नाही. त्यामुळे चांगल्या दर्जाचा कोळसा आयात करावा लागतो. सारांश, भूगर्भातून मिळणाऱ्या इंधनाची (तेल, वायू व कोळसा) आयात वाढतच जाणार. आपल्याला जेवढे तेल लागते त्यापैकी ७० टक्के तेल आपण आयात करतो. पण येत्या तीस चाळीस वर्षात गरजेच्या ९० टक्के तेलाची आपणास आयात करावी लागेल, असे दिसते. हे वास्तव लक्षात घेऊन आपणास सध्या व भविष्य काळात लागणारी ऊर्जेची गरज आणि ऊर्जाविषयक धोरणे यांचा विचार केला पाहिजे.

## इराण - भारत वायु- नलिका :-

इराण व भारत यांना जोडणारी तीन - हजार किलो मीटर लांबीचा नळ टाकून इराणहून नैसर्गिक वायू आणण्याची योजना गेल्या काही वर्षात वादाचा विषय होऊन राहिला आहे. सध्या अमेरिकेशी आपला अणुकरार झाला आहे व अमेरिका आणि इराण यांचे संबंध चांगले नाहीत. या पृष्ठभूमीवर या वायू-नलिकेच्या वादाला निराळेच वळण लागत आहे.

इराण, पाकिस्तान व भारत यांना जोडणारी नलिका टाकण्याची ही प्रचंड योजना नव्वदीच्या दशकाच्या पहिल्या काही वर्षात चर्चेत आली. त्यावेळी या नलिकेच्या सुरक्षिततेचा प्रश्न फार महत्त्वाचा वाटत होता; कारण ही नलिका पाकिस्तानातून जाणार आहे. त्यावेळी भारत व पाकिस्तान यांच्यात वैरभाव होता. त्यामुळे या नलिकेविषयीची बोलणी फारशी पुढे गेली नाहीत. परंतु गेल्या काही वर्षात भारत व पाकिस्तान यांच्यातील संबंध सुधारले आहेत. फेब्रुवारी २००४ मध्ये या नलिकाविषयींच्या वाटाघाटी पुनः सुरू झाल्या व त्यात पावला-पावलाने प्रगती होत आहे. सध्या या वाटाघाटीत वादाचे मुद्दे आहेत ते म्हणजे वायूची किंवा, वायू वाहून नेण्याचा खर्च, नलिकेचे संरक्षण आणि वायूची किंमत वाढविण्याचा अधिकार आपला असला पाहिजे, हा इराणने धरलेला हट्ट.

इराणमधील असालुयेह या दक्षिणेकडील बंदरापासून ही नलिका सुरू होईल. पाकिस्तानमधील बलुचिस्तान व सिंध या डोंगराळ आणि वैराण राज्यातून पुढे जात ही नलिका अखेर दिल्ली व मुंबई इथे पोचेल. सध्याच्या अंदाजाप्रमाणे या नलिकेसाठी सात अब्ज अमेरिकन डॉलर्स इतका खर्च येईल. या प्रकल्पाचा उद्देश इराण मधील नैसर्गिक वायू भारत व पाकिस्तान या ऊर्जा-बुभुक्षू देशांना पोचवावा हा आहे. तथापि, इराण या वायूसाठी जी किंमत लावतो आहे, ती अडचणीची बाब होऊन राहिली आहे. जुलै २००६ मध्ये झालेल्या वाटाघाटीत इराणने एक एम् -बीटीयू (दहा ब्रिटिश थर्मल एकांक) इतका ऊर्जेसाठी मागितलेला दर भारत व पाकिस्तान यांना फारच अवाजवी वाटला होता.

फेब्रुवारी २००७ मध्ये भारत व पाकिस्तान दोघांनाही प्रत्येक एम्बीटीयू साठी ४.९३ अमेरिकन डॉलर्स देण्याची तयारी दाखविली. त्यानंतर इराणने असा आग्रह धरला की, दर तीन वर्षांनी वायूच्या किंमतीचा फेरविचार झाला पाहिजे; कारण वायूचा पुरवठा अनेक दशके होत राहणार आहे व बाजारपेठात किंमती बदलत राहात

असतातच. सध्या जो प्रस्ताव चर्चेला आहे त्यानुसार या प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यात दर दिवशी तीन कोटी मेट्रिक टन इतका वायू भारत व पाकिस्तान यांना पुरविण्यात येईल. इराणचे म्हणणे आहे की, किंमतीच्या पुनर्विचाराचे कलम 'बाजारपेठेतील वास्तवाचे आकलन' होत राहावे यासाठी घालावयाचे आहे. या तरतुदीमुळे कराराला भक्कमपणा (सँक्टिटी) येईल.

पण इराणला अभिप्रेत असणारा 'भक्कमपणा' हा वायूच्या किंमतीपुरता मर्यादित नाही. इराणची अशी अपेक्षा आहे की, या करारामुळे भारत व इराण यांच्यात जो बंधुभाव निर्माण होणार आहे त्याचे प्रतिबिंब भारताचे संयुक्त युरोप, अमेरिका व आंतरराष्ट्रीय अणुसंघटना (आय.ए.-टी.ए.) यांच्याशी जे संबंध व सहकार्य आहे त्यातही पडले पाहिजे. इराणच्या दृष्टीने नलिकेच्या प्रकल्पाने भारत व इराण यांच्यात निर्माण झालेल्या सहकार्याला केवळ आर्थिक अंगच आहे असे नाही. आंतरराष्ट्रीय संबंधातही इराणला भारत व पाकिस्तान यांचे पाठबळ मिळाले पाहिजे. त्यामुळे दर तीन वर्षांनी होणाऱ्या किमतीचा पुनर्विचार ही इराणच्या बाजूने भारत-पाकिस्तानच्या डोक्यावर टांगलेली तलवार आहे. पुनर्विचाराच्या कलमामुळे भारत, व पाकिस्तानच्या आंतरराष्ट्रीय व्यवहारात आपणाला काय साध्य झाले याचा हिशेब मांडण्याची संधी इराणला मिळणार आहे.

भारत व पाकिस्तान यांना ऊर्जेची नड आहे हे अमेरिकेला माहीत आहे. तरीही अमेरिकेचा वायू-नलिका प्रकल्पाला विरोध आहे व तो प्रकल्प बासनात गुंडाळून ठेवा असा दबाव अमेरिका भारत व पाकिस्तान यांच्यावर दाम व दंड यांचा उपयोग करून आणत आहे. हा प्रकल्प प्रत्यक्षात आला तर इराणच्या अण्वस्त्र बनविण्याच्या महत्त्वाकांक्षेला आणि इराणकडून दहशतवाद्यांना मिळणाऱ्या पाठिंब्याला अधिकच जोर चढेल, अशी अमेरिकेला भीती वाटते. तथापि भारत व पाकिस्तान यांनी मात्र वायू-नलिका प्रकल्प पुरा करायचाच असा निश्चय केलेला दिसतो.

नैसर्गिक वायूचा जगातील दुसऱ्या क्रमांकाचा साठा आपल्याकडे आहे, अशी शेखी इराण वारंवार मिरवीत असतो. त्याचवेळी वायू-नलिका प्रकल्पापासून इराणला जी बरकत येईल तिचा उपयोग अण्वस्त्रे तयार करण्यासाठी किंवा दशहतवाद्यांना मदत करण्यासाठी आपण करणार नाही, याची ग्वाही देत असतो. या पैशाचा उपयोग देशाचा सर्वांगीण आर्थिक विकास करण्यासाठीच केला जाईल, असे इराण निक्षून सांगत असतो. नलिका-प्रकल्पाशी संबधित दुसरा प्रश्न म्हणजे या नलिकेचे संरक्षण कसे करायचे, हा आहे. पाकिस्तानातील अशांत व उद्रेकी प्रदेशातून ही नलिका जाणार आहे, हे लक्षात घेतले तर या प्रश्नाचे गांभीर्य स्पष्ट होईल. २००५ च्या जामेवारीत असा प्रसंग घडला की, बलुची बंडखोरांनी त्या भागातील 'सुई' वायू-क्षेत्रावर हल्ला चढवून पाकिस्तानचा इंधन-पुरवठा उद्ध्वस्त करून टाकला. ही घटना भारताला नलिकेच्या सुरक्षिततेविषयी चिंता वाटण्याला पुरेशी आहे.

आपल्या देशातून नलिकेचा जो भाग जाणार आहे त्याच्या संरक्षणाची आपण चोख व्यवस्था ठेऊ असे पाकिस्तान सांगते आहे खरे; पण भारताचा आग्रह केवळ कागदी आश्वासने आणि राजकीय हितसंबंध यांच्या पलीकडे जाऊन या प्रकल्पाविषयी पाकिस्तानने निष्ठापूर्ण तळमळ दाखवावी, असा आहे. भारताची अशी अपेक्षा आहे की, उद्या राजकीय संबंधात बिघाड झाला तरी वायू-नलिकेला त्यामुळे धोका पोचता कामा नये इतकी या प्रकल्पाविषयांची बांधिलकी पाकिस्तान व इराण यांनी व्यक्त केली पाहिजे.

अशा अडचणी असल्या तरी आर्थिक, राजकीय व संरक्षणात्मक फायद्यांसाठी ही तिन्ही राष्ट्रे वायू नलिका-प्रकल्प पूर्ण व्हावा या दृष्टीने पावले टाकत आहेत. गेल्या जूनमध्ये इराणच्या तेल-खात्याचे मंत्री घानिमी फार्ड हे दिल्लीला आले असता त्यांनी सांगितले की, उशिरात उशीरा २०११ पर्यंत इराण, दक्षिण पार्स येथील वायूच्या खाणीतून वायू पाठवू लागेल.

## भारत-अमेरिका अणु-करार :-

गेल्या दोन वर्षांपासून भारत व अमेरिका यांच्यात अणूच्या शांततामय वापरासंबंधात सहकार्य करण्याविषयी बोलणी चालू होती. या वाटाघाटीतून असे ध्यानात आले की, दोन्ही देशात अनेक मुद्यांवर टोकाचे मतभेद आहेत. भारताने १९७४ मध्ये प्रथम अणुस्फोट

घडविला तेव्हा बऱ्याच महासत्तांना त्याचा राग आला होता. अमेरिकेने भारताला आर्थिक मदत देण्यावर निर्बंध घातले व इतर अनेक देशांनी त्याचे अनुकरण केले. या निर्बंधाचा मुख्य भाग असा होता की, भारताला इतर देशांकडून अणूच्या लष्करी व नागरी अशा दोन्ही पद्धतींच्या वापराला योग्य असे तंत्रज्ञान मिळविता येणार नाही. त्यामुळे अणूपासून ऊर्जा मिळविण्याच्या भारतीय योजनांना मोठी खीळ बसली होती.

भारताने अण्वस्त्र-बंदी-करारावर सही केलेली नाही. त्यामुळे अणूपासून वीज निर्माण करणारे रिॲक्टर्स किंवा अशा रिॲक्टर्सना लागणारे इंधन आयात करणे भारताला शक्य होत नाही. भारत-अमेरिका अणु-करारापासून मुख्य अपेक्षा ही आहे की, अणूपासून वीज करण्याच्या मार्गातील ह्या अडचणी दूर होतील. सध्या भारताला लागणाऱ्या ऊर्जेपैकी २ टक्क्यांहूनही कमी ऊर्जा अणूपासून तयार होते. भारत-अमेरिका अणु-करार पूर्णपणे व समाधान-कारकरीत्या अंमलात आला तर अणु-ऊर्जेचे हे प्रमाण, जास्तीत जास्त, सात ते नऊ टक्क्यापर्यंत जाईल.

या कराराच्या बाजूने दुसरा युक्तिवाद केला जातो तो असा की, १९७४ पासून तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात भारताला वाळीत टाकल्यासारखे झाले आहे. अंतराळ-संशोधन, कृषी, औषधीशास्त्र अशा गैरलष्करी क्षेत्रातील तंत्रज्ञानदेखील भारताला परदेशांकडून मिळत नाही. जर आपला व अमेरिकेचा अणु-करार पूर्णत्वाला गेला तर अशा गैरलष्करी क्षेत्रातील तंत्रज्ञान आपल्याला उपलब्ध होऊ शकेल.

असे सांगितले जाते की, या करारातील काही कलमांत अशा तरतुदी आहेत की ज्यांच्या मुळे भारताने यापुढे अणुचाचण्या घेतल्यास अमेरिका अणु-इंधनाचा पुरवठा थांबवू शकेल. तथापि, अशा शंकांचा मोठा बाऊ करणे बरोबर होणार नाही. भारताला जर अण्वस्त्र चाचण्या करायच्याच असतील तर कोणताच करार त्या चाचण्या थांबवू शकणार नाही; आणि त्याचे जे काही परिणाम होतील त्याची शहानिशा त्यावेळी भारताने केलेलीच असेल.

अणु-ऊर्जेमुळे आपले ऊर्जेविषयीचे सर्व प्रश्न सुटणार आहेत अशातला भाग नाही. त्यामुळे इतर प्रकारची ऊर्जा कशी निर्माण करायची किंवा कुठून विकत घ्यायची याचा विचार करावाच लागेल. या प्रश्नांची उत्तरे शोधण्यासाठी येत्या काही वर्षात भारताला किती ऊर्जेची गरज भासणार आहे याचा विचार केला पाहिजे.

**भारताला २०५० सालापर्यंत लागणारी ऊर्जा :-**

२००५ सालापासून २०२५ पर्यंतच्या वीस वर्षात भारतातील तेलाची मागणी ४.३ टक्के तर नैसर्गिक वायूची मागणी ७.३ टक्के वाढत जाईल, असा अंदाज आहे. सध्या भारताला दर दिवशी सव्वीस लाख पिंपे इतके तेल लागते व त्याच्या फक्त पाव भाग तेल देशात निर्माण होते. ही मागणी ७५ लाख पिंपे इतकी वाढेल असा अंदाज आहे. देशात नवीन तेलसाठे सापडले नाहीत तर या मागणीपैकी ८५ टक्के तेल आपल्याला आयात करावे लागेल. सध्या आपली नैसर्गिक वायूची मागणी दर दिवसाला १५ कोटी घन मीटर इतकी आहे. ती ३९ कोटी घन मीटर इतकी वाढेल, असा अंदाज आहे. सध्या देशात १४० जी. डब्ल्यू. (जायगॅ वॅट =१०⁹ वॅट) इतकी वीज तयार होते. २०५० साली आपल्याला १३५० जी.डब्ल्यू. इतकी वीज तयार करावी लागेल. सध्याच्या आखणीप्रमाणे विजेच्या या मागणीपैकी २७५ ते ३०० जी. डब्ल्यू. इतकी वीज अणूपासून, ५४० जी. डब्ल्यू. इतकी वीज कोळशापासून, १४० जी. डब्ल्यू. इतकी जलविद्युत् योजनातून व उरलेली अपारंपरिक ऊर्जास्रोतांपासून निर्माण होईल.

**याबद्दल काय करता येईल?**

गेल्या काही वर्षात भारताने मध्य आशिया, आफ्रिका व दक्षिण अमेरिका या भागातील देशांशी करार करून ऊर्जा मिळविण्याचे प्रयत्न चालविले आहेत. ऊर्जेच्या बाजारपेठेतील ग्राहक म्हणून आपल्याला इतर अनेक देशांशी स्पर्धा करावी लागते. चीनही या बाजारपेठेतील एक स्पर्धक असून त्याची ऊर्जेची गरज आपल्या गरजेपेक्षा कितीतरी जास्त आहे. आंतरराष्ट्रीय बाजारपेठेतून फायदेशीर भावात वीज खरेदी करण्यासाठी कौशल्याने डावपेच आखावे लागतात व त्यासाठी या

कामाचा भरपूर अनुभव लागतो. दुर्दैवाने आपल्याला असा अनुभव नसल्यामुळे चीनला जी किफायतशीर सौदेबाजी जमते तशी आपल्याला जमत नाही.

खरे तर या बाजारपेठेत आपण चीन हा आपला स्पर्धक आहे असे न मानता त्याच्याशी सहकार्याची वृत्ती ठेवली पाहिजे. भारत-अमेरिका अणुकरारानंतर तर आपली व चीनची परस्पर सहकार्याची भूमिका असणे अधिक निकडीचे झाले आहे. चीनची पाकिस्तानशी मैत्रीच नव्हे तर जवळीक आहे आणि पाकिस्तानने अणुविद्येचा फैलाव व्हावा यासाठी जे गुप्त जाळे निर्माण केले त्याला चीनचा हातभार होता. सुदैवाने दोन्ही राष्ट्रांना स्पर्धेपेक्षा सहकार्य अधिक फायद्याचे हे पटलेले दिसते. २००६ साली चीनच्या अध्यक्षांनी भारताला भेट दिली. त्यावेळी काढलेल्या संयुक्त पत्रकात म्हटले होते की, दोन्ही देश अणु- ऊर्जेच्या क्षेत्रात परस्परांशी सहकार्य करतील.

आपली ऊर्जेची दीर्घकालीन गरज निर्वेधपणे भागेल अशा हेतूने आपण आय्. टी. ई. आर. (इंटरनॅशनल थर्मोन्युक्लियर एक्स्पिरिमेंटल रिॲक्टर) या प्रकल्पात भागीदार झालो आहोत. अमेरिका, चीन, रशिया, जपान, दक्षिण कोरिया व संयुक्त युरोप हे इतर भागीदार आहेत. फ्रान्सच्या दक्षिण भागात एक 'फ्युजन रिॲक्टर' तयार करण्यात येणार आहे. त्यासाठी १२८० कोटी डॉलर्स खर्च होणार आहे. हा रिॲक्टर बांधायला आठ वर्षे लागतील व त्यातून वीज निर्माण व्हायला २०४० साल उजाडेल. त्याच बरोबर भारताने अणुविजेच्या निर्मितीच्या स्वतःच्या योजनाही तयार केल्या आहेत. भारताने जागतिक सत्ता बनण्याची ईर्षा बाळगली आहे; त्यामुळे विजेचा पुरवठा ही केवळ व्यावहारिक गरज नाही तर लष्करी गरजही होऊन बसली आहे. महाशक्ती होऊ इच्छिणारे राष्ट्र ऊर्जेच्या बाबतीत स्वयंपूर्ण असले पाहिजे.

भारताची अंतराळ संशोधन संस्था (इस्रो) हिने चंद्रावर उपग्रह सोडण्याची (व माणूस उतरविण्याची) जी योजना आखली आहे त्यामागे ऊर्जेचे नवे स्रोत शोधण्याची प्रेरणा आहेच. वैज्ञानिकांचे म्हणणे आहे की, चंद्रावर हेलियम-३ नावाचे द्रव्य आढळते, त्याचा उपयोग केल्यास जगाचे ऊर्जेचे प्रश्न सुटू शकतील. या द्रव्यापासून ऊर्जा मिळविण्यासाठी जे तंत्रज्ञान हवे ते कशा प्रकारचे असेल याची आताच कल्पना करणे शक्य नाही; पण चंद्रावर पोचणे ही त्या तंत्रातीलच एक पायरी आहे.

भारताची ऊर्जाविषयक अर्थव्यवस्था मूलतः कोळश्यावर आधारलेली आहे. जास्तीत जास्त आशावादी हिशोबाने सुद्धा २०३१ -३२ सालापर्यंतदेखील ही स्थिती तशीच राहील. कोळशावरच्या आपल्या भिस्तीचा वाईट परिणाम म्हणजे कोळशाच्या वापरामुळे निर्माण होणारे प्रदूषण. दुसऱ्या बाजूला, म्हणजे तेलाच्या उपयोगाचा, विचार करायचा तर आपल्याला तेल पुरविणारे मध्य आशियातील देश व नायजेरिया इथे राजकीय अस्वस्थता नांदत असते. थोडक्यात सांगायचे तर अणु- ऊर्जा हा एक स्रोत असा आहे की ज्यापासून प्रदूषणाचा धोका कमीत कमी संभवतो. पण येती अनेक वर्षे आपल्याला लागणाऱ्या ऊर्जेचा अगदी थोडाच भाग अणूपासून मिळणार आहे. यामुळे प्रदूषणमुक्त असे दुसरे काही ऊर्जास्रोत शोधण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे.

सध्या जगभर जैव - इंधन (बायो-फ्युएल) हा एक पर्यायी ऊर्जा स्रोत होऊ शकतो अशी चर्चा आहे. इथॅनॉल हे जैव-इंधनापैकीच एक इंधन आहे. एप्रिल २००७ मध्ये आपण 'इथॅनॉल मिश्रित पेट्रोल' असा एक राष्ट्रव्यापी कार्यक्रम जाहीर केला. इथॅनॉल हे साखर आंबवून तयार करता येते किंवा मका, बटाटे अशा पिष्टमय पदार्थातील साखर निराळी करून व ती आंबवून तयार करता येते. इथॅनॉलचा उपयोग औषधे, मद्यव्यवसाय व कारखाने यात होतोच पण ते पेट्रोलमध्ये मिसळून किंवा स्वतंत्रपणे वाहनांना गती देण्यासाठी वापरता येते. वाहनांची सध्याची यंत्रे, त्यात कोणताही बदल न करता, इथॅनॉल + पेट्रोल या मिश्रणावर चालू शकतात. इथॅनॉलचे वैशिष्ट्य म्हणजे त्याचे उत्पादन पुनःपुनः होऊ शकते व त्याच्या वापरापासून प्रदूषणाचा धोका नसतो. इथॅनॉलमिश्रित पेट्रोलमुळे वाहनाची कार्यक्षमता वाढतेच पण धूरही कमी होतो.

## संरक्षण आणि ऊर्जा :-

लष्कराला युद्ध काळात पडणारी ऊर्जेची गरज आणि शांततेच्या काळात वाटणारी ऊर्जेची गरज यात फरक आहे. युद्धासारखी आणीबाणीची परिस्थिती कधीही उद्भवू शकते. त्यामुळे प्रत्येक देश ऊर्जेचा काही साठा

डावपेचाचा भाग म्हणून राखीव ठेवत असतो. ऊर्जेच्या गरजेविषयीच्या लष्कराच्या योजना व लष्कराला भविष्य-काळात किती ऊर्जेची जरूरी लागेल याबद्दलचे लष्कराचे अंदाज याची माहिती गोपनीय असल्यामुळे तिच्या विषयी कोणीच नक्की काही सांगू शकणार नाही. तथापि आपल्या आसपासच्या बदलत्या परिस्थितीत बदलत्या गरजांचा काही कयास बांधता येणे शक्य आहे. त्यातून येत्या काळात लष्कराला किती प्रमाणात ऊर्जा लागेल हे स्थूल मानाने समजू शकेल.

उत्तर व पूर्व आफ्रिकेपासून अग्नेय आशिया पर्यंत जो चंद्रकोरीसारखा भूभाग पसरला आहे त्यावर राजकीय अस्थिरता, मूलतत्त्ववाद व दहशतवाद यांचे थैमान चालू आहे. गेल्या काही वर्षात या भागात थरारक असे दहशतवादी घातपात झाले आहेत. या भूभागाच्या ऐन केंद्रस्थानी भारत आहे. स्वातंत्र्यापासून भारताला आपल्या दोन शेजाऱ्यांकडून झालेल्या आक्रमणांना तोंड द्यावे लागले आहे. त्यापैकी एक शेजारी तरी आपल्याशी उघड वैर करून राहिला असून या सर्व काळात त्याने आपल्यावर हल्ला करण्याचे साहस वारंवार केले आहे. चीनबरोबर आपले भूप्रदेश व सीमा या प्रश्नांवरून वाद आहेत. आपल्याला दहशतवाद आणि स्थानिक बंडखोरी यांच्या रूपाने आपल्या शेजाऱ्याने चालविलेल्या छुप्या युद्धाला तोंड द्यावे लागत आहे. काही शेजारी राष्ट्रात यादवी चालली आहे व तिच्या झळाही भारताला पोचत असतात. देशातील अतिरेकी चळवळींमुळे देखील अंतर्गत सुरक्षा तणावपूर्ण झाली आहे. आपल्या आसपास अण्वस्त्रे व क्षेपणास्त्रे यांचा सुळसुळाट झाला आहे. आपले दोन शेजारी उघड-उघड अण्वस्त्रधारी देश झाले आहेत आणि त्यांच्या आपल्या संबंधांचा इतिहास आक्रमणे व लढाया यांचा इतिहास आहे. खेरीज या परिसरातील इतर राष्ट्रांनाही अण्वस्त्रांचे ज्ञान उपलब्ध होईल ही शक्यता लक्षात घेऊन चालले पाहिजे. मोठ्या प्रमाणावर हानी करणारी अस्त्रे अतिरेकी टोळ्यांच्या हाती पडतील, अशी भीती आहेच.

आपले नाविक हितसंबंध आपण सुरक्षित राखले पाहिजेत. भारताचे जीवन समुद्राशी जखडलेले आहे. आपल्या परदेशी वापरापैकी ९५ टक्के व्यापार समुद्रमार्गाने चालतो. हिंदी महासागरीय प्रदेशातील संरक्षण-व्यवहारावर आपण सतत नजर ठेवून असले पाहिजे. हिंदी महासागरीय प्रदेशात अतिरेकी संघटना आणि गुन्हेगार टोळ्या यांचा गजबजाट असतो. ह्या संघटना व टोळ्या अंमली पदार्थ, शस्त्रास्त्रे, गुलाम यांची वाहतूक करतातच पण चाचेगिरीही करतात. मलाक्काच्या सामुद्रधुनीतून दरवर्षी साठ हजार जहाजे जा - ये करतात व इराणच्या खाडी भागातील तेल व इतर ऊर्जा-साधने याच सामुद्रधुनीतून पूर्व आशियाला पोचतात.

भारताचा विकास - दर वर्षाला ८ ते ९ टक्के इतका आहे. त्यामुळे आपली ऊर्जेची भूक जबरदस्त असून ती वाढतेच आहे. आपल्याला बहुतेक परदेशी ऊर्जा (तेल, वायू इ.) समुद्राच्या मार्गानेच मिळते. आपले स्वतःचे असे आर्थिक प्रभाव क्षेत्र (एक्स्क्ल्यूसिव्ह इकॉनॉमिक झोन) सुमारे वीस लाख चौरस किलो मीटर इतक्या प्रदेशावर पसरलेले आहे. आपल्या भविष्यातील विकासासाठी त्या क्षेत्रावर आपला लष्करी प्रभाव देखील राहिला पाहिजे.

आपण पाहिले की आपल्या परिसरात आपणाशी वैरभाव बाळगणारे देश आहेत, त्यामुळे आपल्या लष्कराला कायम दक्ष राहाणे भाग आहे. आपल्याला खडी फौज मोठ्या संख्येनें ठेवावी लागते; मग वर वर पाहता युद्धशून्य परिस्थिती का असेना. बरे, जिथून कुठून धोका संभवेल त्या दिशेने लष्काराची हालचाल ठेवावी लागते; सैन्याला नवीन डावपेचांची व शस्त्रांची माहिती व्हावी यासाठी सराव द्यावा लागतो; अंतर्गत बंडाळीच्या विरोधात किंवा निसर्गसंकटाशी सामना करायला सैन्य पाठवावे लागते. त्यामुळे लष्कराची वाहतूक हा देखील ऊर्जेच्या खर्चाचा विषय होतो. भारतीय सशस्त्र दलांना सध्या संक्रमण काळातून जावे लागत आहे. नवीन तंत्रज्ञानाची रोज भर पडते आहे. युद्धविषयक डावपेचात बदल होत आहेत. त्यात संगणकांचा वापर वाढतो आहे. साहजिकच ऊर्जेची मागणी वाढतेच आहे.

**<u>समारोप :-</u>**

दक्षिण आशिया क्षेत्रातील एक महासत्ता म्हणून आपला देश ओळखला जातो. जगातील महत्त्वाची आणि

वेगाने विकास पावणारी अर्थसत्ता म्हणूनही आपली गणना होते. आपला आर्थिक प्रभाव व हितसंबंध फार मोठ्या प्रदेशावर पसरले आहेत. गेल्या दोन दशकात भारतीय उद्योगांचा अफाट प्रमाणावर विकास होतो आहे. अनेक बहुराष्ट्रीय कंपन्या भारतात भांडवल गुंतवणूक करीत आहेत. याच गुंतवणुकीतून पायाभूत सुविधांचा विकासही मोठ्या गतीने होत आहे. भारताच्या प्रभाव क्षेत्राला नैसर्गिक संपत्तीचे वरदान लाभले आहे; पण हाच प्रदेश अनेक समस्यांनी ग्रासलेला आहे. आपला कुणाच्या भूभागावर दावा नाही किंवा आपल्याला कुणाशी भांडणही उकरून काढायचे नाही. या अर्थाने आपला उद्देश 'जैसे थे' परिस्थिती राखावी इतकाच असू शकतो.

आपल्याला नागरी व लष्करी उपयोगासाठी मोठ्या प्रमाणावर ऊर्जा लागते व ऊर्जेची मागणी येत्या काही वर्षात अनेक पटींनी वाढणार आहे. कोणत्याही एका प्रकाराची ऊर्जा आपल्या सर्व गरजा पूरवू शकेल असे नाही. त्यामुळे आपण ऊर्जा मिळविण्याचे सर्व पर्याय खुले ठेवले पाहिजेत. ज्यांच्याकडे अतिरिक्त ऊर्जा आहे अशा देशांशी स्वतंत्र, म्हणजे एकात-एक, किंवा सामुहिक करार करून आपण ऊर्जा मिळविण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. आपल्याला लागणारी बहुतेक ऊर्जा येती कित्येक वर्षे हायड्रोकार्बनपासूनच मिळत राहील हे नक्की; पण आपण पर्यायी ऊर्जास्रोतांचा व तंत्रज्ञानांचा शोध घेतला पाहिजे. नैसर्गिक वायू व जैवऊर्जा यांच्यावर आपण अधिक भर दिला पाहिजे. आपल्या वर्तमान व भविष्यकालीन गरजांचा आढावा घेऊन त्यांचे सुयोग्य नियोजन केल्यास महासत्ता बनण्याची चालून आलेली संधी हुकणार नाही.



**Reference**

1. I P Khosala (Ed), *Energy and Diplomacy*, Konark Publishers, New Delhi, 2005.

2. Shebonti Ray Dadwal, "An Energy Crisis in the Making? : India's Policy Options", in N S Sisodia and C Uday Bhaskar (Ed), *Emerging India*, Promilla and Co, New Delhi, 2005.

3. Carin Zissis, "India's Energy Crunch", http://www.cfr.org/publication/12200/indias_energy_crunch.html

4. Brig (Retd) Gurmeet Kanwal, Securing India's Energy Needs, *Indian Defence Review*, July-Sep 2007, Vol. 22 (3)

5. Reshmi Kazi & Rohit Honawar, Briefing and Discussions for US Air War College Delegation, held at Institute for Peace and Conflict Studies, New Delhi during March 2005.

6. In consultation with and inputs received from Shri Animesh Roul, Executive Director, www.sspconline.org

7. Subhash Kapila, "India's Energy Security: Three Significant Developments", Boloji. com, Aug 25, 2007.

8. Address by Murli Deora, Minister of Petroleum and Natural Gas, Government of India, on the occasion of Annual General Meeting of US Energy Association at Washington, DC on April 4, 2006.

9. *Priyadarshini Singh*, "Ethanol and India's Energy Security", IDSA Strategic Comments, June 07, 2007, www.idsa.in

10. Shri Pranab Mukherjee's Address at the Carnegie Endownment for International Peace. Washington, DC on June 27, 2005 on India's Strategic Perspectives, in his capacity as a Defense Minister.



# ऐतिहासिक अणु करार व बदलते अमेरिकन परराष्ट्र धोरण

प्रा. डॉ. ए. बी. जगदाळे

सन १९९८ नंतर भारत ज्ञानाधारित सत्ता (नॉलेज पॉवर) म्हणून जगासमोर आल्याने अमेरिकेसह अनेक प्रगत राष्ट्रांना आपली दखल घ्यावी लागली. राष्ट्राध्यक्ष बुश यांना भारताचे सार्वभौमत्व, स्वतंत्र सुरक्षाविषयक धोरण आणि स्वायत्त अणुऊर्जा धोरण मान्य करावे लागले. भारत-अमेरिका आण्विक कराराद्वारे भारताला अण्वस्त्रधारी देश म्हणून मान्यता मिळून भारताच्या सामर्थ्याची प्रचिती आली. प्रस्तुत लेखामध्ये दोन्ही देशातील बदलत्या परराष्ट्र धोरणाचा आढावा घेण्यात आला आहे.

प्रथम व द्वितीय महायुद्धातील अमेरिकेच्या प्रचंड योगदानामुळे व त्याच्या लोकशाही तत्त्वाचा स्वीकार करण्याच्या धोरणामुळे भारतीयांच्या मनात त्या देशाविषयी आपुलकीची भावना होती. १९५० मधील कोरियन युद्ध व १९५१ मधील जपान शांतता तह या प्रश्नावर दोन्ही राष्ट्रांच्या भूमिका परस्पर विरोधी राहिल्या. १९५४ मध्ये अमेरिका - पाकिस्तान लष्करी संरक्षण मदतीचा करार होऊन पाकिस्तानच्या लष्करी क्षमतेत वाढ झाली. साहजिकच भारतात अमेरिकेविषयी कटू भावना निर्माण झाली. त्याचे पर्यवसान म्हणजे भारत - रशिया सहकार्याचे युग निर्माण झाले. १९५६ मध्ये सुवेझ कालव्याच्या राष्ट्रीयीकरणाच्या मुद्द्यावरून ईजिप्त विरूद्ध ब्रिटन, फ्रान्स व इझ्रायल यांनी संयुक्त लष्करी कारवाई केली तेव्हा परत एकदा भारत व अमेरिका यांचे दृष्टिकोण परस्परविरोधी राहिले. १९६२ च्या दरम्यान चीनची अण्वस्त्रक्षमता वाढलेली होती यातून भारताला नवीन अण्वस्त्र धोरणाची गरज भासू लागली. तत्कालीन परिस्थितीत बड्या पाच देशांनाच अधिक अण्वस्त्रक्षमता वाढविण्याचा आणि इतर देशांना अण्वस्त्रापासून परावृत्त करण्याचा दृष्टिकोण १९६८ च्या 'अण्वस्त्र-प्रसारबंदी करार' (Non-Proliferation Treaty-N-PT) मध्ये दिसून येतो. या करारावर स्वाक्षरी करण्यास भारताने नकार दिला. सहाजिकच भारत अमेरिका संबंध तणावग्रस्त होऊन आंतरराष्ट्रीय निर्बंध भारतावर लादण्यात आले.

मध्यंतरीच्या कालखंडातील भारत - अमेरिका सहकार्य वगळता १९७१ च्या भारत - पाकिस्तान युद्धात अमेरिकेने पाकिस्तानची बाजू घेतल्यामुळे दोन देशातील तणाव अधिकच वाढला. त्यातून १९७१ चा भारत-रशिया मैत्री व सहकार्य करार संपन्न झाला. या सालाच्या अखेरीस दक्षिण आशियामध्ये इस्लामाबाद, बीजींग, वॉशिंग्टन आणि नवी दिल्ली – मॉस्को असे दोन परस्परविरोधी अक्ष (axes) तयार झाले. सन १९७४ मध्ये भारताने अणुस्फोट घडविल्यानंतर तारापूर अणुविद्युत प्रकल्पाला लागणाऱ्या युरेनियम पुरवठ्यावर निर्बंध लावण्यात आले. भारताने जरी आंतरराष्ट्रीय क्षेत्रात ही चाचणी शांततापूर्ण चाचणी आहे असे जाहीर केले तरीसुद्धा भारताचा अणुऊर्जा कार्यक्रम धोक्यात आला. कॅनडा व फ्रान्सने आंतरराष्ट्रीय निर्बंधाच्या नावाखाली मदत देण्याचे नाकारले. भारताला आपला अणुप्रकल्प कार्यक्रम स्थगित करावा लागला. अमेरिकेने तारापूर अणुविद्युत केंद्राला शोधित युरेनियमचा पुरवठा बंद केल्यामुळे ते केंद्र बंद पडण्याची शक्यता निर्माण झाली. यापुढील दहा वर्षात भारताच्या अणुऊर्जा कार्यक्रमाची पूर्णपणे अधोगती झाली.

भारत - अमेरिका ऐतिहासिक अणुकराराच्या वर दिलेल्या पार्श्वभूमीला भारताचा आण्विक कार्यक्रम आणि वेळोवेळी भारताने NPT व CTBT या करारावरती केलेले मतप्रदर्शन कारणीभूत होते असे इथे म्हणावेसे वाटते. आंतरराष्ट्रीय निर्बंधाच्या जाळ्यात अडकलेल्या भारताच्या अण्वस्त्रकार्यक्रमाला बाहेर काढण्यासाठी सन १९८३ ते १९९४ मधील भारताचे प्रयत्न लक्षणीय ठरतात. भारतीय संरक्षण उत्पादनातील आपली स्वयंपूर्णता सिद्ध करण्यासाठी १९८३ मध्ये 'संरक्षण संशोधन विकास संघटनेची' (Defence Research and Development

Organization - DRDO) ची स्थापना करण्यात आली. भारताच्या महत्त्वाकांक्षी क्षेपणास्त्र कार्यक्रमामध्ये 'पृथ्वी', 'त्रिशूल', 'आकाश', 'नाग', 'अग्नि' ही क्षेपणास्त्रे महत्त्वाची ठरली.[१] या क्षेपणास्त्रांच्या विश्वासार्हतेबद्दल जरी शंका असली तरी अमेरिका, रशिया, चीन, फ्रान्स आणि इस्त्राएल यांच्यानंतर स्वतःची क्षेपणास्त्रे विकसित करणारे भारत हे जगातील सहावे राष्ट्र ठरले.[२]

भारतीय अवकाश संशोधन संघटने (ISRO)ने उपग्रह प्रक्षेपित करणारी वाहने बनवण्यात आपली सिद्धता पूर्ण केली. भूस्थिर उपग्रह प्रक्षेपित करणाऱ्या वाहनासाठी क्रायोजेनिक इंजिनचे तंत्रज्ञान मिळविण्याचा करार रशिया बरोबर केला. आंतरराष्ट्रीय निर्बंधाच्या नावाखाली या करारावर सुद्धा अमेरिकेने दबाव टाकला व क्रायोजेनिक तंत्रज्ञान भारताला न मिळेल अशी आंतरराष्ट्रीय व्यवस्था केली त्यामुळे भारताचा हा प्रकल्प दोन वर्षांपर्यंत लांबणीवरती पडला.[३] भारताच्या क्षेपणास्त्र आणि आण्विक कार्यक्रमावरील दबाव आणखीनच वाढत राहिला. सन १९९८ नंतर भारत ज्ञानाधारित सत्ता (नॉलेज पॉवर) म्हणून जगासमोर आल्यामुळे अमेरिकेसह अनेक प्रगत राष्ट्रांना आपली दखल घ्यावी लागली. राष्ट्राध्यक्ष बुश यांना भारताचे सार्वभौमत्व, स्वतंत्र सुरक्षाविषयक धोरण आणि स्वायत्त अणुऊर्जा धोरण मान्य करावे लागले. भारत–अमेरिका अण्विक कराराद्वारे भारताला अण्वस्त्रधारी देश म्हणून मान्यता मिळून भारताच्या सामर्थ्याची प्रचिती आली.

**<u>आण्विक करार</u> :**

भारतीय स्वातंत्र्यानंतर लोकशाही व उदारमतवाद या दोन महत्त्वाच्या घटकावर भारत व अमेरिका संबंध दृढ व्हावयास पाहिजे होते, परंतु आंतरराष्ट्रीय राजकारणातील दोन महासत्तामधील शीतयुद्ध परिस्थितीमुळे तसे घडू शकले नाही. सोविएत साम्यवादाला पायबंद घालण्याच्या अमेरिकेच्या धोरणामुळे व भारताच्या असंलग्नता (नॉन अॅलाइनमेंट) धोरणामुळे उभय देशात संघर्षाची व तणावाची परिस्थिती होती. भारत–पाकिस्तान फाळणीनंतर लगेचच अमेरिकेने काश्मीर संदर्भात पाकिस्तानची बाजू घेतली. अमेरिकेच्या जाचक अटीमुळेच भारत अमेरिकेकडून आर्थिक व तंत्रज्ञानात्मक मदत घेऊ शकला नाही. भारतातील भिलाई मधील पोलाद कारखान्याकडे अमेरिकेने व मित्रराष्ट्रांनी पाठ फिरविली. भारताला हवी असलेली प्रगत शस्त्रास्त्रे सुद्धा देण्याची तयारी अमेरिकेने दर्शविली नाही.

वरील पार्श्वभूमीवर इ.सन १९५५ व १९६२ मध्ये सोविएत संघाने भारताशी करार करून तंत्रज्ञान व कर्ज उभारणीमध्ये मोलाचा वाटा उचलून भारत सोव्हिएत मैत्री पर्वाची सुरवात केली. दरम्यानच्या काळात अमेरिकेकडून पाकिस्तानला आर्थिक व तंत्रज्ञानाच्या मदतीचा ओघ सुरू झाला. सिएटो (SEATO) आणि बगदाद या अमेरिकेच्या लष्करी करारात पाकिस्तानचा समावेश करण्यात आला.[४]

भारताने योजनाबद्ध आर्थिक विकासाचे धोरण स्वीकारले. देशाच्या असंलग्नतेच्या तत्त्वानुसार दोन महासत्तांच्या राजकारणात न पडता, एकाच देशाशी कायम बांधील अशा धोरणाचा स्वीकार न करता स्वतंत्र अस्तित्वाचे, सुरक्षिततेचे तत्त्व अंगीकारले गेले. या भारतीय परराष्ट्रधोरणाच्या वैशिष्ट्यामुळे भारत अमेरिका संबंध मैत्रीचे झाले नाहीत आणि भारत - सोविएत मैत्रीला पुष्टी मिळत गेली. दोन महासत्तातील शीतयुद्ध समाप्तीनंतर व सोविएत रशियाच्या विघटनानंतर अमेरिकेच्या दक्षिण आशियातील प्रभावाला उतरती कळा लागली. भारताने आपल्या आर्थिक धोरणामध्ये बदल करून व्यापार व उदारीकरणाच्या मार्गातून विकासाचे ध्येय निश्चित केले. या धोरणाला काँग्रेस व भाजपने सुद्धा पाठिंबा दिला व आर्थिक सुधारणा घडवून आणल्या. अमेरिकेचे या आर्थिक सुधारणेमध्येही अडथळे चालूच राहिले. याचा उच्चांक म्हणजे इं. सन १९९८ च्या भारताच्या अणुचाचण्यांची भर पडली आणि भारत - अमेरिका संबंध तणावग्रस्त झाले. पाकिस्ताननेही भारताच्या बरोबरीने अणुचाचण्या घेतल्या व दोन्ही राष्ट्रांवर पुन्हा एकदा आंतरराष्ट्रीय निर्बंध लावण्यात येवून भारत - अमेरिका, पाकिस्तान - अमेरिका संबंध बिघडले गेले. दरम्यानच्या काळात भारत - अमेरिका द्विपक्ष वाटाघाटीच्या अनेक फेऱ्या होऊन वॉशिंग्टन अशा निर्णायक अवस्थेत येवून पोहचले की दक्षिण आशियातील

आण्विक प्रश्न निर्बंधाच्या माध्यमातून सुटू शकणार नाही. अमेरिकेच्या मतपरिवर्तनामुळे भारताच्या आर्थिक व आण्विक क्षमतेला न्याय मिळेल अशी परिस्थिती निर्माण झाली. त्याचेच फलित म्हणून होत असलेल्या ऐतिहासिक अणु-कराराची घटना दुर्लक्षित करून चालणार नाही.

अमेरिका वरील निर्णयाप्रत पोहचण्याची आणखी एक घटना म्हणजे १९९६ मध्ये रशियन परराष्ट्रमंत्री येवगेनी प्रिमाकॉव यांनी मांडलेली रशिया - चीन - भारत 'सामरिक त्रिकोणा' (Strategic Traingle) ची कल्पना होय. रशियाने आपल्या परराष्ट्र धोरणात बदल करून पुनश्च एकदा आशियाचे महत्त्व दृष्टिकोणात आणले. ह्या त्रिकोणाचा हेतू कोणत्याही राष्ट्राविरोधी नाही असे जरी जाहीर झाले तरी अमेरिकेच्या हे लक्षात आले की हे तीन देश एकत्र येणे आपल्या हिताचे नाही. साहजिकच वॉशिंग्टनचा निर्णय भारताच्या बाजूने पडला व पाकिस्तान विषयीची अमेरिकेची भावना अधिक ताठर बनली. हे धोरण जवळ जवळ एप्रिल १९९९ ते मार्च २००० पर्यंत कायम राहून काश्मिरविषयी तटस्थ भूमिका ठेवूनच अमेरिका भारताच्या बाजूने राहिली. याहीपुढे जाऊन ११ सप्टेंबर २००१ च्या दहशतवादी हल्ल्यानंतर अमेरिकेने पाकिस्तानशी मैत्री वाढवली, आर्थिक मदत दिली तरीसुद्धा भारताशी मैत्री टिकविण्यात अमेरिका यशस्वी झाली. भारत–पाकिस्तान 'समावेशक संवाद' (Composit Dialogue) सुरू ठेवण्याचे श्रेय अमेरिकेने घेतले. याठिकाणी असे नमूद करावेसे वाटते की, भारतीय संसदेच्या हल्ल्यानंतरच्या परिस्थितीत दक्षिण आशियातील अमेरिकेची खंबीर भूमिका द्विराष्ट्रीय (भारत–पाकिस्तान) वाटाघाटीत उपयोगास येऊन भारत–अमेरिका मैत्रीपर्व अखंड चालू राहिले. आण्विक कराराच्या रूपाने हे पहावयास मिळत आहे.

**<u>आण्विक करार - स्वरूप</u>** :

भारत - अमेरिका ऐतिहासिक अणु सहकार्य करारावर अखेर दोन्ही सरकारात एकमत झाले आहे. त्यामुळे अमेरिकेकडून समृद्ध युरेनियम खरेदी करण्याचा भारताचा मार्ग मोकळा झाला आहे. शिवाय अणुभट्ट्या उभारण्यासाठी अत्याधुनिक तंत्रज्ञानही अमेरिकेकडून मिळणार आहे. अर्थात त्या बदल्यात आपल्या २२ पैकी १४ अणुभट्ट्या तपासणीसाठी भारताला खुल्या कराव्या लागणार आहेत. तथापि उल्लेखनीय बाब म्हणजे लष्करी अणु-आस्थापने आंतरराष्ट्रीय निरीक्षकांपुढे खुली न करण्याचा अधिकार भारताने कायम राखला आहे. शिवाय यापुढे भारत ज्या अणुभट्ट्या विकसित करेल त्याचे वर्गीकरण लष्करी किंवा नागरी आस्थापनामध्ये करण्याचे स्वातंत्र्यही भारताला देण्यात आले आहे. आण्विक कराराद्वारे विजेसाठी अमेरिकेकडून समृद्ध युरेनियम अणु इंधन मिळणार असून अत्याधुनिक अणुभट्ट्या व अणुतंत्रज्ञान विकास साधन सामुग्री उपलब्ध होणार आहे. १९७१ व १९९८ मधील पोखरण अणु चाचण्या नंतरचे निर्बंध संपणार आहेत आणि भारत–अमेरिका संबंधांना नवी बळकटी प्राप्त होणार आहे. भारताने स्वबळावर तयार केलेल्या अत्याधुनिक अणुभट्ट्यांची तपासणी आंतरराष्ट्रीय संस्थाना करू द्यावयाची की नाही याबाबतचा निर्णय घेण्याचे संपूर्ण स्वातंत्र्य भारताला देण्यात आले आहे. भारत–अमेरिका यांच्यातील या कराराचे आंतरराष्ट्रीय अणुऊर्जा अधिकरणाने स्वागतच केले आहे.

अनेक दशकांच्या परस्पर संशयाला विराम देत मैत्रीच्या नव्या युगात अमेरिका व भारत यांनी प्रवेश केला. दोन देशांदरम्यान ऊर्जा, कृषी विज्ञान व तंत्रज्ञान, व्यापार, गुंतवणूक, उच्च तंत्रज्ञान, आरोग्य आणि पर्यावरण विषयक १४ करार करण्यात आले. अमेरिकेशी झालेल्या अणुऊर्जा सहकार्य करारांमुळे भारतातील अणुभट्ट्यांवर आंतरराष्ट्रीय निरीक्षकांची देखरेख राहणार आहे परंतु यातून 'फास्ट ब्रीडर' अणुभट्ट्या वगळण्यात आल्या असून हा भारताच्या दृष्टीने सर्वात महत्त्वाचा निर्णय आहे, असे मत अणुऊर्जा आयोगाचे अध्यक्ष अनिल काकोडकर यांनी व्यक्त केले आहे. जड पाण्याचा वापर करून निर्माण करण्यात येणाऱ्या अणुऊर्जेच्या किती तरी पट अधिक ऊर्जा कमी इंधनाद्वारे निर्माण करण्याचे काम 'फास्ट ब्रीडर' अणुभट्ट्या करीत असतात. भारताकडे समृद्ध युरेनियमचा साठा मर्यादित आहे. विद्यमान साठ्यातून आपल्याला १० हजार मेगावॅट ऊर्जा निर्माण करता येईल परंतु 'फास्ट ब्रीडर' अणुभट्टामध्ये याच साठ्यातून तब्बल पाच लाख मेगावॅट ऊर्जानिर्मिती करता येईल.[५]

सन १९७४ ते १९८४ या दहावर्षात एकही नवीन भट्टी कार्यरत झाली नाही. अणुऊर्जा कार्यक्रमाची ही अधोगती झाली होती. १९८४ पासून कल्पक्कम (चेन्नई) येथील प्रत्येकी १५५ मे.वॅ.च्या संपीडित जड पाण्याच्या भट्ट्या सुरु झाल्या. १९९३ मध्ये काक्रापारा (२०२ मे वॅ.x २) तर १९९९ मध्ये केगा (२०२ मे वॅ x २) आणि रायतभरा येथे (२०२ मे वॅ x २) तसेच २५०० मध्ये तारापूरची ४९० मे. वॅट च्या भट्ट्या मार्गी लागल्या. याशिवाय रशियाच्या मदतीने उभारण्यात आलेल्या ८०५ मे.वॅ. च्या दोन भट्ट्यांमधूनही लवकरच वीजनिर्मिती होणार आहे. २००७ ते २०१० च्या दरम्यान आणखी ३१२८ मे. वॅ. वीज उपलब्ध होणार आहे.

इराणप्रमाणे अण्वस्त्र प्रसार बंदी करारावर स्वाक्षरी करणाऱ्या देशांमध्ये भारताचा समावेश नाही. याच बरोबर भारत गैरअण्वस्त्रधारी देशही नाही. या वैशिष्ट्यपूर्ण स्थितीमुळेच भारतातील १४ अणुभट्ट्यांच्या निरीक्षणासाठी वेगळे निकष तयार करण्यात यावेत अशी विनंती भारतातर्फे आंतरराष्ट्रीय अणुऊर्जा संस्थेला करण्यात येणार आहे. ऐतिहासिक अणु-कराराद्वारे भारताला अण्वस्त्रधारी देश म्हणून मान्यता मिळाली ही सत्य बाब असली तरीसुद्धा येणाऱ्या भावी कालखंडामध्ये भारताला आपली सिद्धता करावी लागणार आहे. भारताला अणुऊर्जा निर्मितीसाठी अमेरिकेकडून अणुइंधन मिळविणे तेव्हाच शक्य होणार आहे, जेव्हा अणुऊर्जा निर्मिती विषयी अमेरिकन कायद्यात दुरूस्ती करण्यासाठी अमेरिकन काँग्रेसची अनुमती त्यापाठोपाठ ४५ अणुइंधन पुरवठादार देशांची संमती आणि अणुभट्ट्या निरीक्षणासाठी आंतरराष्ट्रीय अणुऊर्जा संस्थेच्या निकषात बदल इतक्या गोष्टी घडून येतील. अशा अडथळयामधून भारत सहीसलामत बाहेर पडल्यानंतरच भारताला अणुऊर्जा निर्मितीसाठी अमेरिकेकडून अणुइंधन मिळविणे शक्य होणार आहे.

भारताकडे असलेल्या २२ पैकी अणुऊर्जा निर्मितीसाठीच्या १४ अणुभट्ट्या निरीक्षणासाठी खुल्या करण्यात येतील व अणुइंधनाचा पुरवठा होईपर्यंत हे निरीक्षण करता येईल, लष्करी वापराच्या अणुभट्ट्यांचा त्यामध्ये समावेश असणार नाही या मुद्द्यावर या कराराला अंतिम रूप देण्यात आले आहे. याशिवाय भविष्यात बनविल्या जाणाऱ्या अणुभट्ट्या अणुऊर्जेसाठी असतील की त्यांचा लष्करी उपयोग केला जाईल हे ठरविण्याचा अधिकारही भारताला असेल आणि करारात दुरूस्ती करण्याचे सार्वभौम अधिकारही भारताला असतील अशी पूर्वअट भारताने घातली आहे. या करारामुळे भारतासाठी अत्यंत महत्त्वाचे असलेले विविध क्षेत्रातील तंत्रज्ञान अमेरिकेने थांबवले होते. तेही आता उपलब्ध होईल. अमेरिकन संरक्षण आणि सामर्थ्याविषयीचे एक अभ्यासकार अॅशले टेलीस यांनी अमेरिकन सरकारला दिलेला सल्ला या ठिकाणी महत्त्वाचा वाटतो. त्यांच्या मताप्रमाणे जगातील भारत ही येत्या १० वर्षात चौथी महासत्ता होणार आहे. तर येत्या २५ ते ५० वर्षात जगातल्या पाच महत्त्वाच्या आर्थिक महासत्तांपैकी भारत एक असेल. अमेरिकेने भारताला महासत्ता बनवण्याच्या कामात इतकी मदत करावी की ज्यामुळे भविष्यकाळात दक्षिण आशिया उपखंडातील शांततेच्या प्रक्रियेत भारताची भूमिका महत्त्वाची असेल. पर्यायाने चीनचा प्रभाव कमी होईल. अशिया खंडात वेगाने उगवणारी चीन ही नवी महासत्ता पुढल्या काळात अमेरिकेला राजकीय आव्हान देणार आहे. त्यावर अंकुश ठेवणारा दोस्त अमेरिकेला आतापासून जोडणे भाग आहे. चीन, रशिया, भारत यांच्या संयुक्त आघाडीच्या विरोधात भारत - अमेरिका सहकार्य करार महत्त्वाचा मानला जातो. जागतिकीकरणाच्या माध्यमातून भारतात तीस कोटी नवा संपन्न मध्यमवर्ग निर्माण झाला आहे. अमेरिकेच्या दृष्टिकोणातून ही एक मोठी बाजारपेठ आहे. भारतात सरासरी वयोमान ३० पेक्षा कमी असल्याने भारत ज्ञान संशोधन या क्षेत्रात जागतिक नेतृत्वसंपन्नशील झाला आहे. हीच भारताची आजची ज्ञानाधारित सत्ता (नॉलेज पॉवर) होय. बुद्धिमान, जिज्ञासू व अभ्यासू तरुणांची रेलचेल असलेला भारत एकमेव देश आहे. भारतीय प्रज्ञावंतांची मदत अमेरिकेला भविष्य-काळात घ्यावी लागणार आहे. त्यासाठीच पाकिस्तानला अणु-मदत नाकारून पाकिस्तानची नाराजी घेऊन भारताशी अध्यक्ष बुश यांनी ऐतिहासिक अणु-करार केला. परावलंबी पाकिस्तान व स्वयंभू सार्वभौम भारत हे अमेरिकेने ओळखून आपल्या धोरणात वेळीच बदल

करण्याचे कसब दाखवले आहे.[६]

गेली पन्नास वर्षे अमेरिकेच्या सक्रिय मदतीने व पाठिंब्याने पाकिस्तानने भारताशी सतत शत्रुत्व केले. दहशतवाद्यांचे प्रशिक्षण तळ सुरू केले. युद्धे केली, निरपराध काश्मिरींची सामूहिक हत्याकांडे घडवली. शिवाय पाकिस्तानचे अण्वस्त्र शिल्पकार डॉ. कादिर अब्दुल खान यांनी इराक व इराणला या तंत्रज्ञानाची विक्री केली. अमेरिकेच्या मनातील पाकिस्तानची विश्वासार्हता कमी झाली. साहजिकच भारताच्या अटींना मान्यता देऊन अणुसहकार्याचा करार करून बुश यांनी उभय देशातल्या मैत्रीचे नवे पर्व सुरू केले. अमेरिकेच्या आजपर्यंतच्या परराष्ट्रधोरणातील हा बदल जगासमोर आला आहे. यापुढील जागतिक राजकारणात आणि जागतिकीकरणात एकट्या अमेरिकेला आपलेच धोरण राबविता येणार नाही हे अध्यक्ष बुश यांनी वेळीच ओळखून भारताशी मैत्री सहकार्य करार केला आहे. चीनच्या परराष्ट्र धोरणातही व्यवहार वादाला (प्रॅग्मॅ-टिझम) महत्त्व प्राप्त होत असल्याचे दृष्टोपत्तीस पडते. त्यामुळे भारताविरोधीच्या पाकिस्तानच्या कारवायाना चीन पाठींबा देईल काय, याबाबत शंका आहे.

११ सप्टेंबरच्या अमेरिकी हल्ल्यानंतर पाकिस्तानचे खरे स्वरूप अमेरिकेपुढे स्पष्ट झाल्यानंतरच अमेरिकेच्या आंतरराष्ट्रीय धोरणात खऱ्या अर्थाने बदल झाल्याचे लक्षात येते. भारताविषयी अमेरिकेने घेतलेली भूमिका हे त्यांच्या बदलत्या धोरणाचेच स्पष्ट रूप म्हणावे लागेल. सध्या जगभर ऊर्जेचा प्रश्न प्रकर्षाने जाणवत आहे. यासाठी अणुऊर्जा हा एकमेव पर्याय उभा राहात आहे. त्याचा वापर करणेच सोईचे होईल. भारताला अण्वस्त्रधारी देशाचा दर्जा प्राप्त होण्याबरोबरच भारताच्या तारापूर अणुऊर्जा प्रकल्पाला इंधन पुरविण्याचा अमेरिकेचा निर्णय हा या कराराचे फलित म्हणण्यास हरकत नाही. हा एक अमेरिकेच्या धोरणांतील क्रांतिकारी बदल म्हणावा लागेल. या बदलामुळेच भारताचे आर्थिक महासत्तेचे स्वप्न साकारण्यास मदत होणार आहे. भारत आणि अमेरिका या दोन देशांच्या सहकार्याचे नवे पर्व सुरू होत आहे.

सन १९९८ मध्ये भारताने केलेल्या अणुचाचणी नंतर अमेरिकेसह ब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, ऑस्ट्रेलिया, जपान या अमेरिकेच्या मित्रराष्ट्रांचा भारताकडे पाहण्याचा दृष्टिकोण अत्यंत प्रतिकूल झाला. आंतरराष्ट्रीय जगतात भारतावर अनेक निर्बंध लादण्यात आले. विभागीय संतुलनासाठी चीनचा वाढता प्रभाव कमी करण्यासाठी अमेरिकेला भारताचे सहकार्य महत्त्वाचे वाटते. डॉ. मनमोहनसिंग यांनी स्पष्ट केले आहे की, किमान संरक्षण सिद्धतेसाठी अण्वस्त्र निर्मितीच्या मार्गात अमेरिका अथवा आंतरराष्ट्रीय अणुऊर्जा आयोग कोणताही अडसर निर्माण करणार नाही. बदलत्या जागतिक परिस्थितीत हा करार भारताच्या दीर्घकालीन फायद्याचा आहे.

चीनने आपला उत्कर्ष साधत असताना अमेरिकेच्या मैत्रीसंबंधाचा जास्तीत जास्त लाभ उठवला परंतु आपल्या धोरणात मात्र फारसा बदल केला नाही. स्वार्थ व लबाडी हा चीनच्या धोरणाचा मुख्य आधार राहिल्यामुळे भारताशी मैत्रीपूर्ण संबंध वाढवताना भारताची भविष्यकाळात कोंडी कशी करता येईल याची काळजी चीन सतत घेत आलेला आहे. भारताचा शत्रू पाकिस्तान याच्याशी जवळीक साधण्याचा चीनचा आजपर्यंतचा प्रयत्न यशस्वीच झाला आहे. पाकिस्तानमध्ये आपले लष्करी दल उभारण्यापर्यंत चीन यशस्वी झाला आहे. म्यानमार व नेपाळशी संरक्षण विषयक संबंध वाढविले आहेत. चीनने अतिभव्य लष्करी विस्ताराचा कार्यक्रम हाती घेतला आहे. आंतरराष्ट्रीय राजकारणातील दोन महासत्तामधील शीतयुद्ध समाप्तीनंतर चीन अमेरिकेबरोबर सामर्थ्यांची बरोबरी करू पाहत आहे. अमेरिकेचे याबाबतचे पाऊल पुढेच आहे. जागतिक एकाधिकारशाही तत्त्वाचा पुरस्कार करत अमेरिकेची वाटचाल एकमेव महासत्ता अशीच राहिली आहे. या विचाराला छेद देण्याची ताकद फक्त चीनमध्येच आहे हे अमेरिकन परराष्ट्र खात्याला उमजले आहे. अशा या अण्वस्त्र सज्ज प्रतिस्पर्धी चीनला नियंत्रित ठेवण्यासाठी भारताचा उपयोग अमेरिकेला करून घ्यायचा आहे. चीनने उत्तर कोरियाशी सहकार्य करून पाकिस्तानच्या अण्वस्त्र तंत्रज्ञानाशी देवघेव केल्याचे उघडकीस आले. त्यामुळे अशा चीनला नियंत्रित ठेवण्याची निकड अमेरिकेला भासली आहे. जागतिक दहशतवादाचा मुकाबला करण्याच्या प्रयत्नात भारताचे

लष्करी सामर्थ्य व आर्थिक संपन्नता अमेरिकेच्या लक्षात आली आणि पारंपरिक अमेरिकन परराष्ट्र धोरण बदलून गेले. ऐतिहासिक अणु-करार ही बदलत्या जागतिक व्यूहात्मक संबंधातील पहिली पायरी आहे.[७]

जागतिक दहशतवादाचा मुकाबला करण्याच्या मोहिमेमध्ये अमेरिकेने जगभर लोकशाही राजवट आणण्याचे प्रयत्न चालवले आहेत. अफगाणिस्तानात लोकशाही उभारण्याच्या त्यांच्या प्रयत्नात भारताची मदत मोलाची ठरली आहे. इराकमध्येही निवडणुकांद्वारे सरकारची स्थापना करण्यात यश आले आहे. मात्र पॅलेस्टाईनमध्ये लोकशाहीचा प्रयोग पुरता अयशस्वी होऊन दहशतवादी संघटनाच सत्तेवरती आली. अमेरिका व भारत या दोघांच्या मूळ श्रद्धा लोकशाही वरच्या आहेत. भारताने ६० वर्षांच्या कालखंडात मूळ आव्हानांना तोंड देत लोकशाही तत्त्वाचाच अंगीकार केला. भारत - अमेरिका अणुऊर्जा करार म्हणजे भारताला मिळालेली लोकशाही तत्त्वाची पावती आहे. जागतिक अण्वस्त्र प्रसारबंदी करारावर भारताने सही केलेली नसतानाही अमेरिकेने भारताला अणुशक्ती संपन्न राष्ट्राचा दर्जा दिला ही भारतासाठी गौरवाची बाब आहे. अमेरिकेने भारताचीच निवड का केली याची निश्चित कारणेही देता येतात. भारतातील लोकशाही व्यवस्था व येथील ११० कोटी लोकसंख्या हे मुख्य कारण आहे. या देशात लोकशाही पद्धतीने सत्तांतर घडून येते. शेजारील देशाप्रमाणे येथे कोणत्याही प्रकारचा रक्तपात होत नाही. आपला देश अमेरिकेपेक्षा मोठा लोकशाही असलेला देश आहे. अमेरिकेची लोकसंख्या केवळ ३० कोटी आहे. याशिवाय भारतीयांनी अमेरिकेत आपल्या प्रतिभेचे जे मानदंड प्रस्थापित केले त्यामुळे अमेरिकेची ओढ भारताकडे राहिली आहे. भारतीय लोकांच्या बुद्धीमत्तेविषयी अमेरिकन सरकारला जाणीव आहे.

भारताचे आर्थिक महासत्तेचे स्वप्न साकार होण्याच्या कार्यात या अणुकराराचे महत्त्व नाकारता येत नाही. या दोन सत्तांमधील मैत्री सहकार्याद्वारे अमेरिकेतील व अन्य देशातील औद्योगिक घराणी भारतात गुंतवणूक करण्यासाठी तयार होतील. जागतिक लोकमताच्या कानोश्यातून अमेरिका इस्लामविरोधी आहे असा सूर निघत आहे. भारत हे धर्मातीत राज्य आहे. भारतात मोठ्या प्रमाणात मुस्लीम समाज राहतो. या देशाने इस्लाम खऱ्या अर्थाने जाणून घेतला आहे. हा आशयसुद्धा अमेरिकेच्या नजरेआड आहे असे म्हणता येत नाही. अमेरिकन परराष्ट्र नीतीच्या कौशल्याचा परिपाक म्हणजेच भारत - अमेरिका ऐतिहासिक अणुकरार होय.



**संदर्भ :**

१. एशियन रेकॉर्डर मार्च १२-१८ १९९४ पृ. २३८११.
२. डाटा इंडिया १९९२ पृ. ३०५
३. उत्तरा सहस्त्रबुद्धे - 'इवॉल्व्हिंग इंडिया - रशिया रिलेशन्स' अ स्ट्रेटेजिक पार्टनरशिप' वर्ष २००२ पृ. ८३
४. भारत - सोविएत संबंध - अभ्यास लेख - गिरीश मिश्र पृ. ५९.
५. लोकसत्ता - ३ मार्च २००६.
६. लोकशाहीचा लाभांश - अभ्यास लेख - राहूल बोरगावकर पृष्ठ ५ -२००६.
७. मैत्रीची नवी पहाट - भारत अमेरिका संबंध विश्लेषण. खा. विजय दर्डा पृष्ठ ४. २००६.
८. भारत - अमेरिका संबंधाचा नवा अध्याय - अभ्यास लेख - २००६ पृष्ठ २.
९. भारत - अमेरिका आण्विक करार : पार्श्वभूमी आणि परिणाम. समाज प्रबोधन पत्रिका ऑक्टो. डिसें. २००६ पृष्ठ ३६७.





बाई
२४/१०
ग्रंथालय


# मनोयुद्ध : एक अल्पपरिचित पण घातक शस्त्र


अरुणकुमार भट्ट
अनुवादक : श्री.मा. भावे


वीस मार्च २००३ या दिवशी अमेरिकन नौदलातील बंकर हिल नावाच्या जहाजाने इराणच्या सामुद्रधुनीतून इराकवर टामाहॉक जातीचे क्षेपणास्त्र सोडून दुसऱ्या इराकी युद्धाला सुरुवात केली. पण त्या आधी कित्येक महिने अमेरिकेने इराकी जनता, लष्कर, अभिजन वर्ग आणि सरकार यांच्यावर फार मोठा प्रचारकी हल्ला चढविला होता. उद्देश हा की, त्यांचा युद्धाच्या बाबतीतला हुरूप ओसरून जावा.

अमेरिकी प्रचारकांनी आकाशवाणी, दूरचित्र-वाणी, वृत्तपत्रे, मासिके, इंटरनेट, भ्रमणध्वनी आणि ई-पत्रे अशा सर्व प्रसारमाध्यमांचा सडकून उपयोग केला. अमेरिकेच्या विमानांनी इराकवर, बंकर हिल या जहाजातून हल्ला चढविण्यापूर्वी, चार कोटी प्रचार-पत्रके टाकली होती. या प्रचार-पत्रकात इराकी लोकांना लढण्यापासून परावृत्त करण्यासाठी भक्कम दम भरलेला असे; अमेरिकेच्या फौजांना विरोध करणे कसे फोल आहे, हे समजावून सांगितलेले असे; किंवा प्रचंड संहारकारी शस्त्रांचा वापर करण्याविरुद्ध इशारा दिलेला होता. युद्ध सुरू झाल्यावर कित्येक आठवडे अमेरिकन विमानदल बॉम्ब बरोबरच पत्रके टाकीतच होते. अशा पत्रकांची संख्या आणखी चार कोटी भरेल. ह्या प्रचारकी हल्ल्याचा हेतू लोकांच्या विचारांवर परिणाम करणे हा होताच पण उद्दिष्ट मात्र सद्दाम हुसेनचा पराभव करणे, हे होते. बरे, हा प्रचार एकट्या इराकी जनतेच्या रोखानेच केलेला होता, असे नाही; पश्चिम आशियातील सर्व देशांचा समावेश या प्रचार-युद्धात झालेला होता. या मोहिमेसाठी अमेरिकेने ७५ कोटी डॉलर्स खर्च केले!

मनुष्याच्या प्रत्येक हालचालीसाठी मनाकडून तशी सूचना यावी लागते. युद्ध हे सुद्धा प्रथम मनात ठरते व नंतर प्रत्यक्षात येते. माणसे मनाने युद्धातील विजयाची कल्पना करतात आणि त्यातून त्यांच्या मनात युद्धाचा निश्चय होतो. थोडक्यात म्हणजे कल्पनेपासून प्रत्यक्षाकडे जाण्याची विचाराची वाटचाल प्रथम होते आणि नंतर त्याप्रमाणे वर्तणूक घडते. युद्धांच्या इतिहासाचा अभ्यास केला, तर असे समजून येते की, निरनिराळ्या संस्कृतीतील व निरनिराळ्या काळातील युद्धनेत्यांनी आपले शत्रू व मित्र यांच्या मनावर परिणाम घडवून आणण्यासाठी नाना तऱ्हांच्या उघड किंवा छुप्या प्रचारतंत्रांचा उपयोग केला आणि विजय मिळविला. जन. आयझेन हॉवर हे दुसऱ्या महायुद्धात युरोपातील दोस्तराष्ट्रांच्या सैन्याचे सर्वोच्च सेनापती होते. ते सांगत असत की, परिणामकारी प्रचाराला सुंदर प्रार्थना म्हणण्यापासून ते घातक लष्करी छाप्यापर्यंत कशाचाही उपयोग होऊ शकतो. तथापि, या मनोयुद्धातील सर्वात जास्त वापरलेले शस्त्र म्हणजे प्रचारकाला अनुकूल अशी लोकांची मनोवृत्ती घडावी म्हणून केलेला भाषिक प्रचार, हेच होय.

आपल्याभोवती काय घडते आहे याची माहिती आपल्याला इंद्रिय-संवेदनातून होते. पण त्या माहितीविषयी आपली जी प्रतिक्रिया होते ती आपला पूर्वानुभव, आपल्याला मिळालेले शिक्षण, आपल्या श्रद्धा व मूल्ये, संस्कृती, धर्म अशा अनेक संस्कारातून ठरते. माहिती मिळाल्यावर तिचे जे आकलन आपल्या संस्कारानुरूप आपल्याला होते त्याला आपण 'समजूत' म्हणतो. मनोयुद्धाचा जो कर्ता असतो त्याची इच्छा, त्याचे जे लक्ष्य असते अशा समुदायाची, किंवा श्रोतृवर्गाची म्हणा, समजूत आपल्या प्रचाराद्वारे आपल्याला अनुकूल करून घ्यावी, अशी असते. श्रोतृवृंदाची समजूत आपल्या लष्करी उद्दिष्टाला आणि आपल्या लष्करी हालचालींना अनुकूल झाली की, हा श्रोतृवृंद आपल्याला अनुकूल अशीच वर्तणूक करील याची या मनोयुद्धकर्त्याला खात्री असते. शत्रूची निर्णय प्रक्रिया राजकीय-लष्करी पातळीवर उद्दिष्टाचा निश्चय होणे, नंतर त्या उद्दिष्ट-प्राप्तीसाठी धोरण आखणे, डावपेच ठरविणे व अखेर त्याप्रमाणे हालचाल करणे इतक्या स्तरांवर होत असते. या प्रत्येक पातळीवर

निर्णय-प्रक्रियेत सामील झालेल्या लोकांचे मत व निर्णय आपल्याला अनुकूल होईल अशा तऱ्हेचा प्रचार करण्याचा मनोयुद्धकर्त्याचा प्रयत्न असतो.

आधुनिक युद्ध, मग त्याची तीव्रता किती का असेना, अतिशय खर्चाचे असते. त्यासाठी फार मोठे मनुष्यबळ आणि साधनसंपत्ती वापरावी लागते. साहजिकच जनमत अनुकूल करून घेतल्याखेरीज कोणत्याही देशाचे सरकार युद्धाची घोषणा करू शकत नाही. तेव्हा मनोयुद्धाची पहिली पायरी ही आपल्या देशातील नागरिकांचे मत युद्धासाठी तयार करणे, इथूनच सुरू होते. त्यामुळे मनोयुद्धाचे लक्ष्य झालेला समाज म्हणजे केवळ शत्रुराज्यातील प्रजा, असेच असत नाही; पण आपल्याशी मित्रत्व राखून असणारे देश, शत्रूशी मित्रत्व राखणारे देश किंवा तटस्थ देश हे देखील मनोयुद्धाचे लक्ष्य होतात. बरे, मनोयुद्धात मनुष्य हानी होत नाही त्याप्रमाणे साधनसंपत्तीही उद्ध्वस्त होत नाही. त्यामुळे मनोयुद्ध प्रत्यक्ष लढाईतच वापरावे असे नाही; शांततेच्या काळातही ते वापरावे. या मनोयुद्धाची शिकार बनणारे लोक केवळ लष्करातीलच असतात असे नाही; साध्या नागरिकांवर आपल्या प्रचाराने परिणाम घडवणे हेही महत्त्वाचे आहे. ज्या शत्रूविरुद्ध प्रचार करावयाचा तो आत्ताच आपला शत्रू असला पाहिजे असे नाही. तो आपला शत्रू पुढे होईल असे वाटत असले तरी बस्स आहे. त्याच्या मनोभूमिकेत बदल व्हावा यासाठी आतापासूनच प्रचाराला सुरुवात करावी. ही गोष्ट शत्रूच्या बाबतीतच करावी असे नाही; मित्रांच्या बाबतीतही प्रचारतंत्र वापरावे.

उत्तर अटलांटिक करार संघटना (नाटो) हिने आपल्या एका पुस्तिकेत मनोयुद्धाची व्यापक व्याख्या केली आहे. तीत म्हटले आहे, "आपल्याशी शत्रुत्व, मित्रत्व किंवा ताटस्थ्य राखणाऱ्या श्रोतृवृंदाची मनोभूमिका आणि वर्तणूक आपल्या राजकीय व लष्करी उद्दिष्टांच्या प्राप्तीला अनुकूल व्हावी यासाठी मनावर परिणाम करणाऱ्या ज्या योजनाबद्ध हालचाली आपण करतो त्या सर्वांचा समावेश मनोयुद्धात होतो. अशा हालचालींपैकी (मुख्य) हालचाली म्हणजे डावपेचांनी मुक्त मनःपरिणामी हालचाली, मानसिक सबलीकरण घडवून आणणाऱ्या हालचाली व प्रत्यक्ष रणांगणावरील मनःपरिणामी हालचाली होत."

युद्धाचे नाना प्रकार असतात. बंडखोरांविरुद्ध युद्ध करावे लागते. बारक्या चकमकी घडत असतात. अगदी शेवटची पायरी म्हणजे सर्वंकश युद्ध. मनोयुद्ध सतत चालते. शांततेच्या काळात ते चालू ठेवावे लागते आणि युद्धाच्या सर्व प्रकारात त्याचा वापर होतोच. मनोयुद्धाला स्थलकाळाची मर्यादा नाही. बरे, या युद्धाचे लक्ष्य केवळ निखालस शत्रूच असतो असे नाही. शत्रूचे दोस्त, आपले दोस्त, तटस्थ राष्ट्रे, स्वदेशाची नागरी व लष्करी प्रजा अशा सर्वांना उद्देशून मनोयुद्ध लढले जाते. मनोयुद्ध हे लढाईसाठी वापरता येणारे लवचिक हत्यार आहे. आपल्या सैन्याची शक्ती ते अनेक पटींनी वाढवू शकते. आपले धोरण व डावपेच यांना अनुसरून त्याचा उपयोग निरनिराळ्या प्रकारे करता येतो. शत्रूला फसविणे, शत्रूवर प्रभुत्व मिळविणे किंवा त्याच्या हालचालींना जखडून ठेवणे, आपल्या सैन्याचा हुरूप वाढविणे किंवा आपल्या सैन्याला शत्रूकडून पोचणाऱ्या धोक्याची सूचना देणे अशा सर्व कामांसाठी मनोयुद्धाचा वापर करता येतो. अर्थात मनोयुद्ध चालविण्यात अडथळेही येत असतात. ज्यांना उद्देशून आपण प्रचार चालविलेला असतो त्या त्या श्रोतृवृंदांच्या काही राजकीय, सांस्कृतिक, धार्मिक श्रद्धा असतात. त्या ओलांडून आपला प्रचार त्यांच्या मनोभूमिकेवर परिणाम करू शकला पाहिजे. आपल्या प्रचारावर आपल्या देशातील राजकारणाची काही बंधने असतात. तसेच, एका विशिष्ट श्रोतृवृंदावर (ऑडियन्स) आपल्या प्रचाराचा जसा मारा होत असतो तसा दुसऱ्या अनेक प्रचारांचा माराही होत असतो. अखेरचे म्हणजे, आपण जो प्रचार करू त्याचा प्रभाव पडू नये म्हणून शत्रूही काही कारवाया करीत असतोच. धोरण व डावपेच यांच्या अनुषंगाने मनोयुद्धाचे जे प्रकार होतात त्याखेरीज, स्थूलमानाने, मनोयुद्धाचे तीन प्रकार संभवतात. प्रचाराचा कर्ता स्वतःची ओळख पटवून देऊन जेव्हा प्रचार करतो, तेव्हा त्या युद्धाला श्वेतमनोयुद्ध म्हणतात; कधी कधी आपण कोण आहोत, कोठे आहोत हे न सांगता किंवा आपण जे आहोत त्यापेक्षा निराळेच कोणी आहोत असे भासवून जेव्हा प्रचार होतो तेव्हा त्याला कृष्णमनोयुद्ध असे नाव देतात; कधी कधी प्रचारकर्ता स्वतःची मोघम ओळख देऊन प्रचार करतो तेव्हा ते मनोयुद्ध करडे (ग्रे) मनोयुद्ध म्हणून ओळखले जाते.

मनोयुद्ध हे लष्करी उद्दिष्टे सिद्धीस जावीत या

हेतूने हाती घेतले जाते. त्यामुळे एकूण युद्धाची आखणी केली जाते तेव्हाच, त्या लष्करी कारवाईचा एक अविभाज्य भाग म्हणून, मनोयुद्धाचा विचार केला गेला पाहिजे. मनोयुद्ध हे उत्स्फूर्त नसते तर त्याची तपशिलवार आखणी केलेली असावी लागते. धोरणात्मक, डावपेचात्मक आणि मुख्य लढाईला पोषक अशी भूमिका मनोयुद्धाला वठवावयाची असते. अर्थात् प्रत्यक्ष शस्त्रास्त्रांना पर्याय म्हणून प्रचार युद्ध वापरता येत नाही.

मनोयुद्धातील मुख्य साधन म्हणजे प्रचार. प्रचारकी वाङ्मयाचा आशय हा प्रथम निश्चित केला पाहिजे. नंतर प्रचाराचे माध्यम, जसे की, वृत्तपत्रीय लेखन, प्रचारपत्रके, आकाशवाणी व चित्रवाणीवरचे कार्यक्रम, दृक् - श्राव्य किती इ., याचा विचार होतो. अखेरचा भाग म्हणजे हे प्रचार वाङ्मय आपल्या लक्ष्यापर्यंत पोचवायचे कसे, ते ठरविणे. एकतर आपण सोयीचे प्रसार-माध्यम वापरू शकतो किंवा प्रचार पत्रके विमानातून शत्रूच्या प्रदेशात टाकू शकतो. तोफेच्या नळीतून शत्रूच्या सैन्यावर प्रचार-पत्रकांची बौछार करणे, हेही शक्य असते. याच्याच अनुषंगाने इतरही महत्त्वाची कामे येतात. प्रचाराचे धोरण व तीव्रता ठरविणे; प्रचाराला गती देणे व तो नियंत्रित करणे; या कामात गुंतलेल्या माणसांचे प्रशिक्षण, योजना, प्रचाराचा होणारा परिणाम तपासणारी यंत्रणा, शत्रूच्या आकाशवाणी व चित्रवाणी प्रक्षेपणात अडथळा आणणे, शत्रूने चालविलेल्या वेबसाईट्स् बंद पाडणे, निरनिराळ्या माध्यमांच्या गळी आपल्या प्रचाराचे काम करण्याची जरुरी उतरविणे, अशा नाना गोष्टी सांभाळाव्या लागतात.

मनोयुद्धातील प्रत्येक खेळी तीन टप्प्यात पूर्ण होते. प्रथम परिस्थितीचा अंदाज घेतला जातो. आपल्याला नक्की काय साधायचे आहे व आपले लक्ष्य झालेला श्रोतृवृंद कोणता हे ठरविले जाते. त्यानंतर प्रचाराचा आशय व त्याची खुलावट यांची योजना आखली जाते. शेवटचा टप्पा म्हणजे अंमलबजावणी. प्रचार-साहित्य योग्य त्या माध्यमातून लक्ष्य झालेल्या श्रोतृवृंदापर्यंत पोचविणे. हे खरेच आहे की, प्रत्येक खेळी हा मोठ्या व सुनियोजित प्रचारयुद्धाचा भाग असल्याने ते भान ठेवूनच प्रत्येक खेळीची योजना व अंमलबजावणी करावयाची असते. मनोयुद्धातील प्रत्येक खेळी ही गोपनीय असते; जे प्रचार साहित्य मोठ्या समुदायापर्यंत प्रक्षेपित करावयाचे असते ते अखेरच्या क्षणापर्यंत गुप्त ठेवले जाते.

शस्त्रसज्ज आणि युद्धोन्मुख अशा शत्रूला आपला मनसुबा बदलावयाला लावता येतो ही कल्पना विलक्षण वाटते; पण जगातील युद्धांचे इतिहास पाहिले तर अनेकदा असे दिसते की, अशी गोष्ट होऊ शकते. महाभारताशी ज्यांचा परिचय आहे अशा भारतीयांना तरी हे सांगायला नकोच की, ऐन युद्धात पांडवांनी द्रोणाचार्यांना हातीचे शस्त्र खाली टाकायला लावले होते. आपला मुलगा मेला, हे कळताच द्रोणाचार्य इतके उद्विग्न झाले की, त्यांनी धनुष्य खाली ठेवले आणि ते आपल्या शत्रूच्या सापळ्यात सापडले. 'बायबल्' मध्ये मनोयुद्धाचे एक मनोरंजक उदाहरण आहे. गिडेऑन नावाचा ज्यूंचा एक सेनापती होता. वाळवंटातील मिडियन नावाच्या टोळीच्या मोठ्या सैन्याशी त्याला लढावयाचे होते. तो स्वतः मानासेह नावाच्या टोळीचा नायक होता आणि त्याचे सैन्य पहात होते. त्यावेळी साधारण शंभर सैनिकांचा एक जथ्था होई; आणि प्रत्येक जथ्थ्याकडे एक मशालजी व एक शिंगवाला असे. गिडेऑनने जथ्थ्यातील प्रत्येकाला एक दिवा, एक घागर व एक शिंग देऊन मिडियन लोकांच्या छावणी - भोवती पसरून दिले. प्रत्येक सैनिकाने रात्र होताच आपला दिवा पेटवून घागरीत ठेवला. रात्री इशारा मिळताच प्रत्येकाने घागर फोडली आणि शिंग वाजवायला सुरुवात केली. मिडियन सैन्याला वाटले की हजारो शत्रुसैनिकांनी आपल्याला वेढले आहे. त्या घाबरलेल्या अवस्थेत त्यांनी आपसातच लढायला सुरुवात केली व पोबारा केले. तिसरे उदाहरण म्हणजे मुहम्मद पैगंबर यांच्या नेतृत्वाखालील नवमुस्लिमांच्या सैन्याचा कुरेशी लोकांच्या सैन्याने ओहदच्या लढाईत पराभव केला. कुरेशी लोकांनी मुसलमानी सैन्यात अशी अफवा पसरविली की, मुहम्मद पैगंबर मारले गेले. या अफवेने मुसलमानी सैन्याचे धैर्य गळाठले आणि ते रणांगण सोडून गेले.

आपल्या सैनिकांचे शौर्य, त्यांची विजिगीषा (जिंकण्याची इच्छा) आणि युद्धकौशल्य यांच्या आख्यायिका पसरवून शत्रूची आपल्यावर स्वारी करण्याची इच्छाच जिरवून टाकायची, या तंत्रात रोमन लोक प्रवीण होते. एका राजाने रोमवर स्वारी करण्याचा घाट घातला. तेव्हा रोमनांनी स्किव्होला नावाचा दूत त्या राजाकडे पाठविला. स्किव्होलाने राजाला नाना परीने समजवण्याचा

प्रयत्न केला. पण राजा त्याचा हट्ट सोडीना. शेवटी तेथे पेटलेल्या शेकोटीवर स्किव्होलाने आपला हात पसरला आणि तोंडातून ब्र न काढता तो हात जळू दिला. शत्रूच्या दूताचे हे धैर्य व निश्चय पाहून राजा घाबरला आणि रोमवर हल्ला करण्याचा विचार त्याने सोडून दिला.

मनोयुद्धाचा अवलंब सायरस या ग्रीक राजाने बॅबिलोन विरुद्ध केला होता; झेरझेसने ग्रीकांविरुद्ध केला होता आणि मॅजिडोनियाचा राजा दुसरा फिलिप याने अथेन्सविरुद्ध केला असे दाखले मिळतात. ॲलेक्झँडरच्या फौजा हिंदुस्थानातून माघार घेत परत जात असताना वाटेतील टोळीवाले त्यांच्या वर हल्ले करीत. या टोळीवाल्यांना भीती वाटावी यासाठी ॲलेक्झँडरचे हस्तक वाटेवर मोठ्या आकाराची चिलखते पसरून ठेवीत. हेतू असा की, ग्रीक सैनिकांच्या सामर्थ्याविषयी टोळीवाल्यांना धास्ती वाटावी. चंगीझखान व त्याचे मोंगल घोडेस्वार हे क्रूर आणि अत्याचारी होतेच. पण त्यांच्या क्रौर्याच्या गोष्टी फुगवून सांगणारे गप्पीदास चंगीझखान पुढे धाडत असे. हे लोक वाटेवरच्या प्रजेत अशी घबराट निर्माण करीत की, त्यांना चंगीझखानाला अटकाव करण्याची इच्छा राहू नये. मनोयुद्धात खऱ्या गोष्टी सांगूनही कसे काम साधता येते, याचे हे जुने पण ऐतिहासिक उदाहरण आहे.

मनोयुद्धाच्या यशाच्या अशा अनेक हकीकती सांगता येतील. हे युद्ध छुप्या पद्धतीने चालत असल्याने त्याच्या घातकपणाकडे जावे तितके लक्ष गेले नाही. सेनापती व उच्चाधिकारी यांची मनोवृत्ती प्रत्यक्ष युद्धाला अपार महत्त्व देऊन मनोयुद्धाला गौणत्व द्यावे, अशी असते. त्यामुळेही मनोयुद्ध प्रसिद्धीच्या झोतात येत नाही. अर्थात् प्रत्येक धूर्त सेनापती मनोयुद्धाचे महत्त्व जाणून असतोच आणि गुप्त रीतीने त्याचा उपयोगही करतो.

पहिल्या महायुद्धापासून मनोयुद्ध ही संकल्पना विकास पावत गेली. बहुतेक युद्धमान राष्ट्रांनी मनोयुद्धाचा अवलंब केला. मनोयुद्धाचा धोरण म्हणून आणि डावपेच म्हणूनही उपयोग होतो. अशा दोन्ही प्रकारांचा उपयोग पहिल्या महायुद्धात करण्यात आला. तसेच शत्रूचे सैन्य व नागरी प्रजा, तटस्थ राष्ट्रे, दोस्त राष्ट्रे, अंकित राष्ट्रे, वसाहती आणि खुद्द राष्ट्राचे नागरिक यांना लक्ष्य करूनही मनोयुद्ध वापरण्यात आले. आजवर या प्रकारच्या युद्धाची जी धीमी प्रगती चालली होती ती संपून आता मनोयुद्धाने एकदम हनुमान उडी घेतली. मनोयुद्धाचे महत्त्व सर्व युद्धमान पक्षांना पटले. जगाच्या इतिहासात पहिल्यांदा मनोयुद्ध हे अंतिम विजय मिळण्यासाठी महत्त्वाचे घटक आहे, हे कळून चुकले.

पूर्वी मनोयुद्धाचा उपयोग 'झाला तर झाला' या वृत्तीतून केला जायचा. पण आता त्याचा पद्धतशीर अभ्यास सुरू झाला. निरनिराळे राज्यकर्ते अधिकृत वा अनधिकृत गैरलष्करी मंडळे निर्माण करून परिणामकारक प्रचार साहित्य कसे करायचे व ते नेमक्या कोणत्या ठिकाणी पोचवायचे याची योजना आखू लागले. लष्करे देखील मनोयुद्धाची ही सामग्री रणांगणावर, शत्रूच्या तटबंदीच्या मागे, शत्रुसैनिकांच्या कुटुंबांपर्यन्त, शत्रूच्या प्रजाजनात कशी न्यायची, वाटायची हे ठरवून त्यासाठी खास पथके उभारू लागली.

पहिल्या महायुद्धात अमेरिका (संयुक्त संस्थाने) हा देश दोस्त राष्ट्रांच्या बाजूला झुकलेला असला तरी बराच काळ तटस्थ होता. आपण युरोपातल्या युद्धापासून अलिप्त राहायचे अशी अमेरिकेची परंपरा होती. युद्ध सुरू झाल्यानंतर तीन वर्षांपर्यंत अमेरिकेने आपला युद्धविरोध व तटस्थता ही कायम राखली. पण इंग्रजांनी प्रचाराचा असा गर्गशा चालविला की, अमेरिकेतील लोकमत युद्धाच्या बाजूने वळले आणि अखेर अमेरिका दोस्तांच्या बाजूने युद्धात उतरली. आपण युद्धात ओढले गेलो याची उमज युद्ध संपून गेल्यावरच अमेरिकेच्या जनतेला झाली.

मनोयुद्धाची ही उत्क्रांती दुसऱ्या महायुद्धात कळसाला पोचली. सर्वंकश युद्ध लढण्याचे डावपेच व तंत्रज्ञानातील प्रगती यामुळे मनोयुद्धाचे महत्त्व दुसऱ्या महायुद्धात पराकाष्ठेचे वाढले होते. पहिल्या महायुद्धाच्या तुलनेने दुसऱ्या महायुद्धांची व्याप्ती आणि तीव्रता खूपच जास्त होती. आकाशवाणीचा शोध आणि त्याचा वाढता वापर यामुळे प्रचारयुद्धाला नवाच आयाम लाभला होता. ब्रिटिशांच्या, त्याकाळी गोपनीय गणल्या गेलेल्या दस्तऐवजात हिटलरची एक उक्ती ग्रंथित केली आहे, ती अशी, "सध्या आपण पायदळाची आगेकूच करण्यापूर्वी तोफांची मारगिरी करून रणांगण मोकळे करतो. भावी काळात या मारगिरीची जागा क्रांतीवादी प्रचाराने घेतलेली असेल. या प्रचाराचे उद्दिष्ट म्हणजे युद्धाला तोंड लागण्यापूर्वीच शत्रूचा तेजोभंग करणे, हे असेल." मनोयुद्ध

ही आता शासन किंवा सैन्य यातील खालच्या दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या अखत्यारितली गोष्ट राहिली नाही. आता दोन्ही पक्षातील उच्चस्तरीय नागरी व लष्करी अधिकाऱ्यांनी हाताळण्याची ती बाब बनली होती. त्यामुळे दुसऱ्या महायुद्धात वाहनांवर लादलेले छापखाने, ध्वनिवर्धक बसविलेले रणगाडे, प्रचारपत्रांनी भरलेले तोफांचे गोळे, मालवाहू मोटारींवर ठेवलेली आकाशवाणी केंद्रे, पत्रकांचा पाऊस पाडणारी विमाने अशा नवलाईच्या गोष्टींचा वापर झाला. ही सुद्धा शत्रूवर जहाल शब्दांचा मारा करणारी हत्यारेच होती.

दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकेचा पक्ष व सोव्हिएट संघराज्याचा पक्ष यांच्यात शीतयुद्ध सुरू झाले. हे तर बहुतेक मनोयुद्धच होते. व्हिएटनाम मधील लढाईत, चित्रवाणीच्या योगाने, लढाईतील क्रौर्य व अमानुषता अमेरिकेतील घरा-घरातून पोचली. ती भीषण दृश्ये पाहून अमेरिकेतील जनतेला युद्धाविषयी उबग आला आणि त्यामुळेच अमेरिकेला माघार घ्यावी लागली. हे मनोयुद्ध वर वर पाहता अमेरिकेतील प्रसारमाध्यमांनी चालविले होते; पण प्रसारमाध्यमांनी घेतलेली औदार्याची व युद्धविरोधी भूमिका कोण्या परराष्ट्राच्या चिथावणीवरूनही घेतली असण्याची शक्यता आहे. या दृष्टीने त्यावेळी अमेरिकेत चालू असलेली 'शांतता मोहीम' (पीस मुव्हमेंट) व साम्यवादी सिद्धान्तांचा प्रचार या गोष्टी लक्षणीय आहेत. युद्धाविषयीच्या अमेरिकेतील जनतेच्या आकलनात आणि भूमिकेत नाट्यपूर्ण परिवर्तन घडून आले. एकीकडे अमेरिकेची मनोयुद्धाचे प्रशिक्षण घेतलेली पथके रणक्षेत्रावर प्रचारपत्रके, ध्वनिवर्धक आणि आकाशवाणी यांच्या द्वारे शत्रुसैनिकांना युद्धातून पळून जाण्याची किंवा शरण येण्याची चिथावणी देत होती आणि त्याच वेळी घरच्या आघाडीवर दूरचित्रवाणीवरून चाललेला प्रचार जनतेच्या युद्धनिर्धाराला सुरुंग लावीत होता! माध्यमांचा जाणकार व तत्त्वज्ञ मॅकलुहान याने म्हटले आहे की, "अमेरिका व्हिएटनामची लढाई व्हिएटनाम मधील रणांगणावर नव्हे तर अमेरिकेतील घरातल्या दिवाण-खान्यातच हरली. दूरचित्रवाणीवर दिसणाऱ्या हिंस्र-दृश्यांनी दिवाणखान्यातील सुखशय्येवर लोळणाऱ्या लोकांची सद्सद्विवेकबुद्धी खडबडून जागी झाली व त्यांना क्रौर्याचा वीट आला."

असे दिसते की अमेरिकेतील लोक आणि संसद हे व्हिएटनाममध्ये अमेरिकेने हस्तक्षेप करावा या मतावर ठाम होते. पण नंतर दूरचित्रवाणीवरील प्रचारामुळे त्यांचे हे मत पूर्ण फिरले आणि अमेरिकेने विकतचे श्राद्ध घेतले आहे, त्याचा निषेध केला पाहिजे अशा भूमिकेवर ते येऊन पोचले. खरे तर अमेरिकेने पूर्वी लढलेली युद्धे (उदा. कोरियातील युद्ध) व व्हिएटनाममधील युद्ध यांच्यात कोणताच मूलभूत फरक नव्हता. पण या युद्धाकडे पाहण्याच्या अमेरिकन जनतेच्या दृष्टिकोणात फरक होता. हा फरक दूरचित्रवाणी या माध्यमातून झालेल्या प्रचारामुळे पडला. व्हिएटनाम मधील लढाईत अमेरिकेचा पराभव रणांगणावर हार होऊन झाला नाही; अमेरिका या राष्ट्रापाशी लढण्याची इच्छाशक्ती न उरल्याने तो झाला.

व्हिएटनाम-युद्धापासून अमेरिकेने धडा घेतला आणि त्यानंतर मनोयुद्धाच्या क्षेत्रात अमेरिकेने खूपच मोठा पल्ला गाठला आहे. आता अमेरिकेच्या लष्कराकडे मनोयुद्धाची जय्यत तयारी असलेली आधुनिक यंत्रणा आहे. १९९१ साली झालेल्या पहिल्या इराकी युद्धात या यंत्रणेचा फार उपयोग झाला. दुसरे इराकी युद्ध व अफगाणिस्तानातील लढाई यात अमेरिकेला जो जय मिळाला त्यातही मनोयुद्धाचा वाटा मोठा होता. इराक व अफगाणिस्तान इथे अमेरिका-विरोधी जे उठाव होतात त्यांना तोंड देण्यासाठी देखील मनोयुद्ध-यंत्रणेचा फार उपयोग अमेरिकेला होतो. ही यंत्रणा आहे तरी कशी याचा थोडा आढावा घेऊ.

अमेरिकेची मनोयुद्ध-यंत्रणा अत्याधुनिक तंत्रज्ञानाने सज्ज असून तिला पैशाची अजिबात कमतरता नाही. या यंत्रणेत अधिकाऱ्यांची सुनिश्चित उतरंड असून प्रत्येकाचे कार्यक्षेत्र, आज्ञापनाचा व नियंत्रणाचा अधिकार काटेकोरपणे ठरवून दिलेला आहे. या यंत्रणेच्या सर्वोच्च स्थानी 'राष्ट्रीय आज्ञापन अधिकार-मंत्र' (नॅशनल कमांड ऑथॉरिटी) असून ही यंत्रणा आणि अमेरिकन लष्कर व सीआयए सारख्या गुप्तहेर संस्था यांच्यात पूर्ण सहकार्य व माहितीचा विनिमय होत राहील अशी काळजी घेतलेली आहे. खेरीज परराष्ट्र खाते, संरक्षण खाते, राष्ट्रीय सुरक्षा परिषद, राष्ट्राध्यक्षांचे कार्यक्रम अशा सगळ्यांपाशी स्वत:ची मनोयुद्ध यंत्रणा आहेच. या यंत्रणा मनोयुद्धाचे धोरण ठरवितात व आपापल्या क्षेत्रातील लक्ष्य झालेल्या

श्रोतृवृंदावर मनोयुद्धाचा प्रयोग करतात. असे असले तरी मनोयुद्धाची सुसूत्रता राखणारी जी मध्यवर्ती संस्था आहे तिच्याकडून अशी काळजी घेतली जाते की या विविध यंत्रणांकडून होणारा प्रचार एकाच उद्देशाने होत राहील आणि त्यात विसंगती दिसून येणार नाही. किंबहुना, निरनिराळ्या यंत्रणांकडून होणारे प्रचार परस्परांना पूरकच राहतील.

निरनिराळ्या यंत्रणांकडून होणाऱ्या कार्यात एक मेळ राखणारी जी यंत्रणा आहे त्या यंत्रणेच्या सर्वोच्च पातळीवर अमेरिकेच्या भूदल ४ हा मनोयुद्ध गट (फोम सायऑप ग्रुप) स्थापन केलेला आहे. अलीकडे या गटाला पदोन्नती देऊन त्याला 'मनोयुद्ध पथक' असा दर्जा दिला आहे, 'अमेरिकी भूदलाची विशेष कारवाई आज्ञापन संस्था' म्हणून भूदलातील उच्चाधिकार संस्था आहे तिच्या अखत्यारीत हे पथक येते. वर सांगितलेली 'आज्ञापन संस्था' ही स्वत: 'राष्ट्रीय विशेष कारवाई आज्ञापन संस्था' (युनायटेड स्टेट्स् स्पेशल ऑपरेशन्स कमांड) या संस्थेच्या सांगण्यावरून काम करते. बहुतेक राष्ट्रांची लष्करे मनोयुद्धाला लष्करी गुप्तहेर खात्याच्या कामाचा भाग म्हणून ओळखतात. पण अमेरिकेचे संरक्षण खाते मात्र मनोयुद्धाला 'विशेष कारवाई' चा दर्जा देऊन गुप्तहेर विभागापासून निराळे ठेवते. याचा अर्थ असा नाही की, हे संरक्षण खाते गुप्तहेर खात्याला कमी लेखते.

'मनोयुद्ध पथक' अनेक सैनिकी तुकड्या प्रशिक्षण देऊन तयार करते व नंतर त्या तुकड्या सैन्याच्या निरनिराळ्या विभागांकडे तैनात करण्यात येतात. 'मनोयुद्ध पथक' म्हणजे एक अजस्र माध्यम व जनसंपर्क यंत्रणा आहे. या पथकाकडे जनसंचार (मास कम्युनिकेशन), मानसशास्त्र, समाजशास्त्र, राज्यशास्त्र, भाषाविज्ञान, गुप्तचर यंत्रणा अशा नाना विषयातील तज्ज्ञ मंडळी काम करीत असतात. हे पथक तऱ्हेतऱ्हेचे प्रचारसाहित्य तयार करते. त्यात आकाशवाणी व दूरचित्रवाणीचे कार्यक्रम, ध्वनिवर्धकावरून द्यावयाचे संदेश, छापील पत्रके अशा सर्व प्रकारच्या साहित्याचा समावेश असतो. हे सर्व साहित्य 'राष्ट्रीय आज्ञापन मंडळा'च्या गरजेप्रमाणे व मागणीप्रमाणे पुरविले जाते.

आपण वर पाहिले की, हे पथक विशेष प्रशिक्षण दिलेल्या सैनिकी तुकड्या 'मनोयुद्ध पथकां'च्या अधीन असतात. जेव्हा या तुकड्यांकडून प्रत्यक्ष काम करून घेण्याची वेळ येते तेव्हा रणांगणांवरील सैन्यविभागांकडे या तुकड्यांना पाठवितात. वाहनांवर किंवा हेलिकॉप्टरवर बसविलेल्या ध्वनिवर्धकावरून त्या तुकड्यांमधील सैनिक शत्रूला उद्देशून संदेश सांगतात आणि शत्रूच्या सैनिकांना शरण येण्याचे आवाहन करतात. या पथकाजवळ 'फोर्ट ब्रॅग' या ठिकाणी असलेले एक प्रचार केंद्र आहे. ८१ लाख डॉलर्स खर्चून या केंद्रात प्रचार पत्रकापासून दूरचित्रवाणी कार्यक्रमापर्यंत कोणत्याही प्रकारचे साहित्य निर्माण करणारी अत्याधुनिक सामग्री बसविली आहे. ११ सप्टेंबर २००१ ('इंटरनॅशनल ट्रेड सेंटर' वर हल्ला झाला तो दिवस) पासून ३० जून २००३ पर्यंत (अमेरिकेने अफगाणिस्तानवर हल्ला केला तो दिवस) या केंद्राने १५ कोटी प्रचार पत्रके तयार केली; १६,००० तास ज्यांचे प्रक्षेपण करण्यास लागतील इतके आकाशवाणी संदेश अफगाणी जनतेला ऐकविण्यासाठी तयार केले. खेरीज, इराकी जनतेसाठी चार हजार प्रक्षेपण-तास पुरतील इतके आकाशवाणी संदेशही ध्वनिलिखित करून ठेवले.

या केंद्राच्या अखत्यारीत 'कमांडो सोलो' नावाची यंत्रणा आहे. आकाशवाणी व दूरचित्रवाणी केंद्रे ज्यावर बसवली आहेत अशी ६ विमाने मिळून ही यंत्रणा होते. प्रत्येक विमानावरील केंद्रातून आकाशवाणी संदेश व रांगेत दूरचित्रवाणी चित्रे प्रसारित करता येतात. सर्व प्रकारची अत्याधुनिक प्रसार व संदेशवहन यंत्रे या विमानांवर उपलब्ध आहेत. लक्ष्य झालेल्या देशातील प्रचार केंद्रातून होणाऱ्या कार्यक्रमाची हुबेहूब नक्कलही ही यंत्रणा करू शकते. त्यामुळे लक्ष्य बनलेल्या देशातील जनतेला वाटते की, हा आपल्याच आकाशवाणी/ दूरचित्रवाणी केंद्रावरून प्रक्षेपित होणारा कार्यक्रम आहे. वेळ पडल्यास शत्रु-राष्ट्राचे प्रक्षेपण केंद्र उचलून आणण्याची करामत देखील ही यंत्रणा करू शकते. आपण पूर्वी पाहिले की, मनोयुद्धाचे श्वेत, कृष्ण व करडे असे तीन प्रकार संभवतात. 'कमांडो सोलो' या यंत्रणेकडे तिन्ही प्रकारचा प्रचार ज्यावरून करता येईल अशी प्रक्षेपण केंद्रे आहेत.

अशा प्रकारची, मनोयुद्धाची सुसज्ज यंत्रणा तर भारतापाशी नाहीच नाही पण उत्तम प्रशिक्षण घेतलेल्या व या कामासाठीच बनविलेल्या अशा छोट्या तुकड्याही

सैन्याकडे नाहीत. सैन्यातील अत्युच्च स्तरावर मनोयुद्धाचा विचार करील अशी प्राथमिक यंत्रणाही नाही. त्यामुळे मनोयुद्धाचा तपशिलवार विचार करणारी सिद्धान्तसंहिता, त्या संहितेवरून ठरविलेले धोरण व त्या धोरणाच्या अंमलबजावणीच्या सूचना देणाऱ्या पुस्तिका असण्याचा प्रश्नच येत नाही. मनोयुद्धाचे प्राथमिक धडे आता कुठे आपण घेत आहोत. तथापि १९७१ सालच्या बांगलादेश युद्धात भारताने मनोयुद्धाचा चांगला वापर केला. त्याचे उदाहरण असे. युद्धाच्या शेवटी ९० हजार सैनिक असलेल्या पाकिस्तानी सैन्याने शरणागती पत्करिली. खरे तर हे पाकिस्तानी सैन्य सुसज्ज होते आणि त्यांच्या पाशी भरपूर रसद होती. झाले असे की, सेनापती माणेकशॉ यांनी पाकिस्तानी सैन्याला उद्देशून भारतीय आकाशवाणीवरून एक जबरदस्त संदेश दिला. हा संदेश आकाशवाणीवरून पुनःपुनः प्रसारित केला जात होता. या संदेशात माणेकशॉ यांनी सांगितले होते की, तुमचे विमानदल आता उड्डाणे करू शकत नाही; तुमच्या बंदरांना आमच्या सैन्याने वेढले आहे व नौदल निकामी झाले आहे; आता आम्हाला शरण येण्याखेरीज तुम्हाला पर्याय नाही. बांगला देशी मुक्ति-वाहिनी व बांगला देशी नागरिक तुम्ही केलेल्या अत्याचारांचा सूड उगवायला टपून बसलेलेच आहेत. (आम्हाला शरण आलात तरच तुम्ही सुरक्षित राहाल.) पाकिस्तानी सैन्य शरण आल्यानंतरही युद्धकैद्यांच्या छावणीत हे मनोयुद्ध चालतच राहिले. एक 'छावणी-वृत्त' प्रसिद्ध करण्यात येई. त्यातून भारताची लोकशाही राज्यपद्धती, राजकारणापासून अलिप्त असणारी सैन्य-दले, ज्या मुळे बांगलादेशाचा प्रसंग उद्‌भवला त्या पाकिस्तानी राजकीय-लष्करी राजवटीचे दोष यांचे विश्लेषण करण्यात येत असे. त्यामुळे अनेक युद्धकैद्यांची पाकिस्तानी राज्यपद्धती-वरील निष्ठा डळमळीत झाली. पुढे, पाकिस्तानात परतल्यावर, अनेक अधिकाऱ्यांना बडतर्फ करण्यात आले.

त्या आधी भारतीय विमानदलाने भूदल प्रमुखाच्या सहीची पाकिस्तानी सैन्याला शरण येण्याचे आवाहन करणारी पत्रके विमानातून टाकली होती. पण हा प्रयोग फार उशिरा, भारतीय सैन्य डाक्याच्या वेशीवर पोचल्यावर करण्यात आला. त्यामुळे त्या पत्रकातील आवाहनामुळे पाकिस्तानी सैन्य शरण आले, असे म्हणण्यात तथ्य नाही. पाकिस्तानी सैन्याची शरणागती हा भारतीयांनी जी कौशल्यपूर्ण व्यूहरचना केली आणि ज्या शौर्याने ती सिद्धीस नेली त्याचा परिणाम होता. या व्यूहरचनेच्या जोडीला तितक्याच कौशल्यपूर्ण मनोयुद्धाची जोड मिळाली असती तर कदाचित पाकिस्तानी सैन्याने पुष्कळच आधी शरणागती पत्करली असती व बरीच हानी आणि रक्तपात टळला असता. माणेकशॉ यांनी म्हटले आहे की, परदेशी हस्तक्षेपाची भीती सतत वाटत असल्यामुळे लवकरात लवकर जय मिळविण्याची निकड होती. अशा स्थितीत मनोयुद्धाचे पाठबळ प्रत्यक्ष युद्धाला दिले गेले असते तर विजय हमखास लवकर मिळाला असता. बांगला देशाच्या सरहद्दीवर लढाई सुरू झाल्यापासून पाकिस्तानी सैन्य ढेपाळले असल्याची लक्षणे दिसत होती.

अशा मोक्याच्या वेळी मनोयुद्धाचा मोठा उपयोग झाला असता.

जे काही मनोयुद्ध झाले त्यात भारताची बाजू चांगलीच वरचढ होती; कारण पाकिस्तानची मनोयुद्धा-विषयीची जाण अगदीच प्राथमिक दर्जाची होती. आपल्या सैन्याचे व लोकांचे मनोबल उंचावण्यासाठी लढाईतील विजयाच्या काल्पनिक व खोट्या गोष्टी प्रसृत करायच्या एवढीच पाकिस्तानची समजूत होती. लढाई सुरू होण्याच्या कित्येक महिने आधीच, ७ एप्रिल १९७१ रोजी, पाकिस्तानी आकाशवाणीने बातमी दिली होती की, जेस्सोर क्षेत्रात जवळ जवळ एक डिव्हिजन इतक्या भारतीय सैन्याचा (पाकिस्तानी सैन्याने) विद्ध्वंस केला! ही पाकिस्तानची चूक पाकिस्तानला चांगलीच भोवली. पाकिस्तानचे विघटन होणे भारताच्या फायद्याचे आहे किंवा नाही यावर भारतीय मुत्सद्यात त्यावेळी, एप्रिल १९७१ मध्ये, मतभेद होते. पण या बातमीमुळे भारतीय मुत्सद्यांना कळून चुकले की, आपला अंतर्गत प्रश्न सोडविण्यासाठी भारताबरोबर युद्ध करण्याची पाकिस्तानची इच्छा आहे.

भारतीय जनतेत पाकिस्तानविषयीचा संताप नुसता खदखदत होता. १९६५ च्या युद्धाच्या मागोमाग हा बांगलादेशाचा प्रश्न व त्यावरून तंटा उद्‌भवला होता. लाखो बांगलादेशी निर्वासित होऊन भारतात आले होते. बांगला देशातील लोकांचा स्वातंत्र्य मिळविण्याचा वज्रप्राय निश्चय झाला होता. भारताला इतकेच करावयाचे होते की

'आम्ही तुमच्या पाठीशी आहोत' असा दिलासा आकाशवाणीवरून आणि प्रचार-पत्रकांच्या द्वारे द्यायचा होता. बंगाली लोकांचे मनोबल अतूट राहावे म्हणून एक छुपे आकाशवाणी केंद्र हुगळी नदीतील एका जहाजावर उभारले. हे जहाज हुगळी नदीत वर-खाली फेऱ्या मारीत असे. त्यामुळे पाकिस्तानी तंत्रज्ञांना 'स्वाधीन बांगला बेतार केंद्र' कोठे आहे, याचा पत्ता लागेना. त्यांना वाटू लागले की, पूर्व पाकिस्तानातूनच हे केंद्र काम करीत आहे.

मार्च-एप्रिल १९७१ मध्ये पाकिस्तानने बांगला देशात आपले सैन्य पाठविले व त्या सैन्याने अमानुष अत्याचार केले. त्यानंतर भारतात एक कोटी निर्वासित आले. भारताच्या मनोयुद्धाचा उद्देश हा होता की, या अत्याचारांचा गवगवा करून पाकिस्तान विषयी इतर राष्ट्रांना वाटणारी सहानुभूती नाहीशी करावयाची. भारतीयांनी पाश्चात्त्य पत्रकारांच्या मनावर हे बिंबविले की, पाकिस्तान हे दोषी व अत्याचारी राष्ट्र आहे. यासाठी या पत्रकारांना भारत सरकारने मुद्दाम निर्वासितांच्या छावण्यात नेले. तेथील निर्वासितांची दुर्दशा त्यांनी पाहिली. खेरीज अत्याचारांच्या चित्रफिती दाखविण्यात आल्या. अमेरिकेतील माध्यमांनी या हकीकती घराघरात पोचविल्या. त्यामुळे अमेरिकन सरकारच्या पाकिस्तान धार्जिण्या धोरणाला लोकांचा पाठिंबा मिळाला नाही.

१९७१ च्या युद्धानंतर भारताने श्रीलंकेत शांतीसेना पाठविली त्यावेळीही मनोयुद्धाचा अवलंब करण्यात आला. काश्मिरातील छुप्या युद्धात व ईशान्येकडील राज्यातील बंडखोरांविरुद्ध देखील मनोयुद्ध वापरले जात आहे. तथापि या प्रत्येक ठिकाणी नियोजनाचा व दीर्घकालीन योजनेचा अभाव दिसतो. भूदलाच्या मुख्य ठाण्यातील संपर्क-केंद्रात याबद्दलचे निर्णय घेतले जातात आणि त्यांची अंमलबजावणी त्या त्या क्षेत्रातील लष्करी अधिकाऱ्यांकडे, अतिरिक्त कार्यभार म्हणून, सोपविली जाते. खरे तर भारतीय सैन्याने मनोयुद्धाचा उत्तम अनुभव कोरियात घेतलेला आहे. कोरियातील युद्धात दोन्ही सैन्यांनी पकडलेले ३० हजार युद्धकैदी भारतीय सैन्याच्या हवाली करण्यात आले होते. साम्यवाद्यांनी पकडलेले युद्धकैदी पुनः आपल्या भांडवलदारी मूळदेशात जायला तयार नव्हते व तीच स्थिती भांडवलदारी देशांच्या सैन्याने पकडलेल्या साम्यवादी देशातील सैनिकांची होती! हा सर्व परिणाम दोन्ही बाजूंनी आपल्या हाती सापडलेल्या सैनिकांचे जे मतपरिवर्तन (ब्रेन वॉशिंग) केले होते, त्याचा होता. मनोयुद्धाचा एक मोठाच धडा भारतीय सेनाधिकाऱ्यांना इथे मिळाला होता. पण असे काही होऊ शकते यावर या अधिकाऱ्यांचा विश्वासच बसेना!

अलीकडे भारतीय सैन्याने मनोयुद्धाशी संबंधित अशा सर्व गतिविधी एकाच आज्ञापन केंद्राच्या अधिपत्याखाली आणण्याचा निर्णय घेतला आहे. या केंद्राचा प्रमुख हा लेफ्टनंट जनरल किंवा त्या दर्जाचा अधिकारी असेल. 'चीफ ऑफ इंट्रिग्रेटेड स्टाफ' नावाचे एक नवे मंडळ स्थापन करण्यात आले असून त्यांच्याकडे मनोयुद्धासाठी एक शाखा आहे. या शाखेचे नक्की कार्यक्षेत्र काय असेल हे प्रकट झालेले नाही. सध्या असे दिसते की, मनोयुद्धविषयक या शाखेकडे सध्या तरी सल्लामसलतीपेक्षा निराळे काम असणार नाही. परंतु या शाखेच्या अखत्यारीखाली, शत्रूला मानसिकदृष्ट्या नामोहरम करण्याच्या ज्या विविध क्लृप्त्या आहेत त्यांचा सामग्र्याने विचार होईल अशी अपेक्षा करायला हरकत नाही.

भारताचे अंतस्थ व बहिस्थ शत्रू भारताविरुद्ध सातत्याने मनोयुद्ध पुकारून राहिले आहेत. त्यामुळे भारतानेही मनोयुद्धाची अधिक पद्धतशीर तयारी करण्याची गरज आहे.

▣▣▣

__टीप__ : डॉ. अरुणकुमार भट्ट यांनी खास 'नवभारत'साठी इंग्रजीतून हा लेख लिहिला होता. त्याचा मराठी अनुवाद डॉ. श्री. मा. भावे यांनी केलेला आहे.

▣▣▣

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ❑ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु. |
| ❑ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु. |
| ❑ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** | ६० रु. |
| ❑ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु. |
| ❑ **तरंगयामिक व पुंजयामिक** । मा. ग. टोळे | २० रु. |
| ❑ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी | १५० रु. |
| ❑ **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट | ६० रु. |
| ❑ **प्रस्थानभेद** (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु. |
| ❑ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे | ४० रु. |
| ❑ **इतिहासाचे तत्त्वज्ञान** (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु. |
| ❑ **दासशूद्रांची गुलामगिरी** (भाग २) । शरद पाटील | १५० रु. |
| ❑ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी | १४० रु. |
| ❑ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य | ५० रु. |
| ❑ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ **पाच पुस्तक-परीक्षणे** । वा. म. कुलकर्णी | ६० रु. |
| ❑ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर | ३० रु. |
| ❑ **कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य** । रा. भा. पाटणकर | १०० रु. |
| ❑ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि.के. बेडेकर | ३० रु. |
| ❑ **आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार** | १०० रु. |
| ❑ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** | १५० रु. |
| ❑ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे | १२० रु. |
| ❑ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** | २०० रु. |
| ❑ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु. |
| ❑ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन** । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |
| ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु. |
| ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता :* **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)**


हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.